# कथा
# स्वामी रामानंद तीर्थांच्या

✦ संकल्पना : वि.र. जोशी ✦ लेखन : अमोल पाटणकर



# प्रस्तावना

स्वामी रामानंदतीर्थ यांच्या जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने ज्ञान प्रबोधिनीच्या अंबाजोगाई विस्तार केंद्राचे ज्येष्ठ सदस्य श्री. वि. र. जोशी यांनी स्वामीजींचे कथारूप चरित्र लिहिले होते. त्या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीला प्रस्तावना लिहिण्याची जबाबदारी माझ्याकडे आली आहे. ज्ञान प्रबोधिनीचा सुवर्ण महोत्सव व स्वामी विवेकानंदांच्या दीडशेव्या जयंतीचे वर्ष या जोड-निमित्ताने या दुसऱ्या आवृत्तीचे प्रकाशन होत आहे.

स्वामी विवेकानंद - स्वामी रामतीर्थ - स्वामी रामानंदतीर्थ असा प्रेरणेचा एक प्रवाह आहे. स्वामी विवेकानंद - ज्ञान प्रबोधिनी असा प्रेरणेचा दुसरा प्रवाह आहे. या दोन्ही प्रवाहांमध्ये 'राष्ट्रधर्म' हा समान आशय आहे. त्यामुळेच १९७४ साली स्वामी रामतीर्थ जन्मशताब्दी साजरी करण्यामध्ये ज्ञान प्रबोधिनीच्या कार्यकर्त्यांचा सहभाग होता.

सोलापूर व पुणे येथे स्वामी रामानंदतीर्थांचे वास्तव्य शिक्षणाच्या निमित्ताने होते. दोन्ही ठिकाणी ज्ञान प्रबोधिनीची केंद्रे आहेत. स्वामीजींनी हिप्परग्याच्या राष्ट्रीय शाळेत अध्यापन केले. हिप्परग्याच्या जवळच हराळीमध्ये ज्ञान प्रबोधिनीचे ग्रामीण केंद्र आहे. स्वामीजींच्या कामाचे केंद्र काही काळ अंबाजोगाईला होते. तिथेही ज्ञान प्रबोधिनीचे काम चालते. समान वैचारिक प्रेरणेबरोबरच समान भौगोलिक परिसर हा ही स्वामीजी आणि ज्ञान प्रबोधिनी यांच्यामधील नात्याचा एक बंध आहे.

सत्ताकांक्षा न ठेवता केलेल्या राजकारणाला ज्ञान प्रबोधिनीमध्ये 'देशकारण' असा शब्द वापरतो. 'देशकारण' करणे हा 'राष्ट्रधर्मा'च्या आचरणाचाच भाग आहे. कामगार चळवळ, शिक्षण, स्वातंत्र्य-चळवळ, लोकसंघटन ही सगळी देशकारणाचीच अंगे आहेत. या सर्वांना अध्यात्माची पार्श्वभूमी मिळाली की तेच देशकारण विवेकानंद-रामतीर्थ प्रणीत राष्ट्रधर्माचे आचरण बनते.

स्वामी रामतीर्थांचे चरित्र अशा राष्ट्रधर्माच्या आचरणाचा एक वर्तनादर्श (role-model) आहे. अगदी सोप्या शब्दात लिहिलेल्या या कथारूप चरित्राने अमूर्त असलेली देशकारणाची संकल्पना मूर्त स्वरूपात समोर उभी राहते. अशा चरित्रांच्या चिंतनातून आणि अनुसरणातूनच अमूर्त संकल्पना समजायला लागतात व आपल्या आयुष्यात काही प्रमाणात उतरवता येतात.

ज्ञान प्रबोधिनी पुणे केंद्रातर्फे विवेकानंद, निवेदिता, हरिसिंह नलुआ आणि ज्ञान प्रबोधिनीचे संस्थापक कै. वि. वि. पेंडसे यांची चरित्रे प्रकाशित झाली आहेत. त्यांच्या वाचनातून जशी प्रेरणा मिळते तसाच परिणाम या चरित्राच्या वाचनाने छोट्या वयोगटासाठी आणि नवसाक्षरांसाठीही होऊ शकेल.

गिरीश श्री. बापट
संचालक

सौर आषाढ ९, शके १९३४
आषाढी एकादशी (३० जून २०१२)

# मनोगत

शाळेत दिन विशेष साजरे होतात. विद्यार्थ्यांच्या मनावर संस्कार करण्यासाठी थोर महात्म्यांच्या चरित्रातील प्रसंग गोष्टीरुपाने सांगितले जातात. बहुतेकांची गोष्टीरुप चरित्र पुस्तके ग्रंथालयात उपलब्ध असतात. 'स्वामी रामानंद तीर्थ' यांच्या संबंधी असे पुस्तक नसल्यामुळे फार अडचण होत होती. स्वामीजींच्या कार्याची माहिती करुन घेण्यासाठी षष्टद्वीपूर्ती प्रसंगीचा 'स्मृती ग्रंथ' वाचून काढला. त्याच्या आधारे त्याचे चरित्रलेखन ठळक प्रसंगांचे वर्णन करुन विद्यार्थ्यांना समजेल असे लिहिण्याचा प्रयत्न केला. काही स्फूर्तीदायक प्रसंगांचे कथाकथन करुन पाहिले. स्वामीजीच्या संबंधीच्या गोष्टी लिहिण्यचे मनात आले. छपाई हेतूने कथा लेखन केले. पण आर्थिक दृष्टीने धाडस करु शकलो नाही. त्यामुळे प्रकाशन केले नाही. पण स्वामीजीच्या संबंधी कथाकथन करण्याचे समाधान मिळत रहिले.

''स्वामी रामानंद तीर्थ'' यांच्या जन्मशताब्दी निमित्त विविध उपक्रमाची आखणी ज्ञान प्रबोधिनी, अंबाजोगाई मार्फत करण्यात आली. 'कथा स्वामी रामानंद तीर्थांच्या' विद्यार्थ्यांसाठी गोष्टीरुप चरित्राचे पुस्तक लिहून प्रकाशित करण्याचे ठरले. स्वामीजींच्यावर 'कर्मयोगी संन्यासी' हे न्या. नरेंद्र चपळगावकरांचे पुस्तक वाचताना अनेक कथा सापडत गेल्या. स्वामीजींच्या सहवासातील व्यक्तींच्याअनुभव कथनाने त्यात भर पडली. चरित्रातील ठळक प्रसंग कथेच्यारुपात सांगून पाहिले. विद्यार्थी कथेतील प्रसंगाशी समरस झालेले दिसले. एकाग्रतेने कथाश्रवण करुन इतरांनाही कथा

सांगू लागले. त्यातून कार्यपूर्तीसाठी शक्ती मिळाली. कथावस्तूला कथेच्या रुपात लिहिण्याचे काम चि. अमोल पाटणकर याने चिकाटीने केले. लेखनाची शुद्धता तपासण्याचे जबाबदारी सौ. निर्मलाताई इटकुरकर यांनी घेतली व परिश्रमपूर्वक आपुलकीने केले. मसने स्क्रिनचे श्री अनंत मसने यांनी मुखपृष्ठ आणि छपाई काम आकर्षक करुन दिले. ज्ञान प्रबोधिनी, अंबाजोगाईनी प्रकाशनाचा धाडसी निर्णय घेतला. अंबाजोगाईकरांनी तन मन धनांनी सहकार्य केल्यामुळे हे गोष्टीरुपी चरित्र उपलब्ध झाले. विद्यार्थ्यांच्या मनात आपण त्यांच्याप्रमाणे देशासाठी, समाजासाठी आयुष्यात काहीतरी करावे. त्यांच्या मार्गाने जाण्याचा मनात क्षणभर जरी विचार आला. तसे वागावे, बनावे वाटले, तर लेखन खटाटोपाचा हेतू साध्य झाला असे माझे प्रामाणिक मत आहे.

मी प्रतिभावंत लेखक नाही. स्वामीजींच्या संबंधीची पुस्तके वाचून सहवासातील व्यक्तींचे अनुभव ऐकून कथालेखनाचे धाडस केले आहे. कथेच्या माध्यमातून स्वामीजींच्या व्यक्तीमत्वामध्ये कमी पणा आल्याचा अपराध घडला असल्यास तो क्षम्य नाही याची मला जाण आहे. आपण उदारमनाने उणीवा समक्ष भेटून किंवा पत्राने कळविल्यास मी आपला ऋणी राहिन.

– वि.र. जोशी




# संन्याशाचे पोर

सिंदगी या गावी खेडगीचे श्री. भवानराव खेडगीकर नावाचे एक शिक्षक रहात होते. ते कन्नड भाषिक शाळेत शिकवत होते. ते अतिशय हुशार होते. ते परिस्थितीने व स्वभावानेही खूप गरीब होते. सातवी पर्यंत शिक्षण झालेले असूनसुद्धा त्यांचा अध्यात्माचा गाढा अभ्यास होता. त्यांना अण्णाराव, गंगाबाई व यमुनाबाई अशी अपत्ये झाली होती. त्यांचा संसार छान चालला होता. त्यांचा मूळचा स्वभाव ईशचिंतनात रमून जाण्याचा होता. त्यांना अध्यात्माची विशेष गोडी होती. म्हणूनच त्यांनी तरुणपणातच संन्यास घेतला. पण पत्नीच्या संमतीशिवाय संन्यास घेतल्यामुळे त्यांच्या गुरुंनी त्यांना परत गृहस्थाश्रमात पाठवले. अध्यात्म व शिक्षकी पेशा असे दुहेरी जीवन ते जगत होते. ते अतिशय कर्तव्यनिष्ठ होते.

त्यानंतर त्यांना तुंगाबाई हे कन्यारत्न झाले. ३ ऑक्टोबर १९०३ रोजी त्यांना एक सुंदर असे पुत्ररत्न झाले, त्याचे नाव व्यंकटेश असे ठेवण्यात आले. हे बाळ अतिशय वेगळे होते, पण गोजिरवाणे होते. संन्यास दीक्षेनंतर तुंगाबाई, व्यंकटेश, कमलाबाई आणि भीमराव अशी चार अपत्ये त्यांना झाली. या सर्वात व्यंकटेशच उठून दिसे. तो नेहमी वेगळ्याच विचारात असे. हळूहळू व्यंकटेश मोठा होत होता. त्याची निरीक्षणशक्ती फार जबरदस्त होती. तो नेहमी वडिलांबरोबर असे. व्यंकटेशही ज्ञानेश्वरांप्रमाणेच संन्याशाचे पोर होता.

शाळेच्या शिक्षणाबरोबरच वडिलांच्या चिंतनशीलतेचे आणि अध्यात्मचे संस्कार व्यंकटेशवर होत होते. भवानरावांचे सगळे वागणेच एखाद्या साधूप्रमाणे होते. ते घरी किंवा नदी काठी ध्यानस्थ बसत, प्राणायाम करीत, प्रार्थना, गीते म्हणत. खडकावर ध्यानस्थ बसलेल्या भवानरावांकडे व्यंकटेश तासन् तास पहात बसे.

# बालपण

बालपणीचे दिवस मजेत चालले होते. वडिलांच्या ध्यान धारणेत व्यंकटेशही स्वत:ला हरवून बसत असे. वडिलांचे मनही मूळच्या विरक्त स्वभावाकडे वळत होते. हळूहळू त्यांचे घरावरचे लक्षही कमी होत चालले होते. त्यातर भर म्हणून की काय, व्यंकटेश आठ वर्षांचा असताना त्याच्या प्रेमळ आईला देवाज्ञा झाली. एवढ्या लहान वयात मातृछाया हरपल्याने व्यंकटेशवर आभाळच कोसळले. तो एकटाच, गप्प रहात असे. या घटनेने आणि पहिल्यापासून वडिलांचे घरात फारसे लक्ष नसल्याने व्यंकटेशने फार मोठा धसका घेतला होता. त्याच्या बाल मनावर आणखी परिणाम होवू नये, म्हणून त्यांची मोठी बहीण गंगाबाई व तिचे पती नरहरभट्ट यांनी मुलांना गाणगापुरास आणले.

व्यंकटेशला त्यांनी गाणगापुरच्या शाळेत घातले. गाणगापुरला भीमा व अमरजा यांचा सुरेख संगम आहे. एकांतप्रिय आणि निसर्गप्रेमी व्यंकटेशला ती संगमाची जागा खूप आवडे. शाळा सुटल्यावर तेथे तो तासन् तास जावून बसे. त्याचे मन तेथे रमे. तेथे गेल्यावर त्याला आपल्या गावाची व ध्यानस्थ बसलेल्या वडिलांची आठवण होई. गाणगापुरास अनेक साधू व बैरागी येत. व्यंकटेश त्यांच्या जवळ जावून लक्षपूर्वक त्यांचा दिनक्रम पाही. त्यांच्या प्रत्येक छोट्या-मोठ्या गोष्टी बाइरकाईने टिपत असे. त्यांच्याशी जवळीक साधण्यासाठी त्यांची छोटी मोठी सेवा करण्याचा प्रयत्न करी. धुनी पेटवून बसलेले साधू, हा त्याच्या विशेष आकर्षणाचा विषय होता. आज इथे तर उद्या तिथे असे भटकणारे साधू, स्वत:मध्येच निमग्न असणारे साधू त्याला आदर्श वाटत.

# आशीर्वाद




व्यंकटेशला दुसऱ्या कोणत्याही मनोरंजनाची गरज भासत नसे. जर दिवसभरही त्याला संन्याशांच्या सान्निध्यात ठेवले, तरीही त्याला कशाचीच आठवण रहात नसे. एकदा व्यंकटेश नदीच्या काठी उभा असताना, एक साधू आपले सायंस्नान आटोपून आन्हिक करीत बसलेल्या अवस्थेत त्याला दिसला, नेहमीपेक्षा विलक्षण दृश्य आज त्याला दिसले. तो साधू ध्यानमग्न होता आणि त्याच्या डोळ्यावाटे अश्रू येत होते. व्यंकटेशला त्याचे आश्चर्य आणि तेवढेच कुतूहलही वाटत होते. भक्तिभावाने व्यंकटेश त्याच्या समोर जाऊन उभा राहिला. बराच वेळ झाला, तरी दोघेही त्याच अवस्थेत होते. तो साधू काही हलायला तयार नव्हता आणि व्यंकटेशही आपली पापणीही न लवता त्याच्याकडे पहात होता.

अंधार केव्हा पडला, याचे त्याला भानही नव्हते. घरी परतण्याची वेळ निघून गेली होती. त्याचे तेथून पाऊल निघत नव्हते. बऱ्याच वेळाने त्या साधूने डोळे उघडले. व्यंकटेश खूप आनंदित झाला व तितकाच भारावूनही गेला. साधू उठून उभा राहिला. व्यंकटेशने त्याला लोटांगण घातले. ''बाळा तू येथे का आलास?'', त्याने विचारले. व्यंकटेशने काहीच उत्तर दिले नाही. साधूने पुन्हा तोच प्रश्न केला. तरीपण व्यंकटेशला काय वाटते, हे तो व्यक्त करु शकत नव्हता. पण दोघांच्याही नजरेत एक वेगळाच भाव तरळत होता. साधूने व्यंकटेशच्या डोळ्यातील व चेहऱ्यावरील भाव वाचले होते. जाण्यापूर्वी वात्सल्यपूर्ण स्वरात साधूने त्याला विचारले, ''तुला काही हवे आहे का?'' आता मात्र व्यंकटेश भानावर आला आणि त्याच्या तोंडून भावपूर्ण असे शब्द निघाले, ''मला तुमच्यासारखे संन्यासी व्हायचे आहे.'' आता त्याच्या चेहऱ्यावरील सर्व ताण मोकळा झाल्यासारखे वाटत होते. साधूच्या डोळ्यातही चमक आली होती. त्याच्या तोंडून ''तथास्तु'', असे शब्द स्फुरले आणि तो तेथून निघून गेला.

# भिक्षा मागून जगेन!

व्यंकटेश सुटी लागताच सिंदगीला वडिलांकडे येत असे. त्यांचे संन्यस्त जीवन अनुभवत असे. 'सीना' नदीकाठी दररोज सायंकाळी त्याचे वडील ज्या खडकावरच्या ज्या जागेवर बसत असत, त्या जागेबाबत त्याला खूप आपुलकी वाटत असे.

एके दिवशी व्यंकटेश वडिलांबरोबर नदीकाठी गेला. वडिलांनी थोडावेळ एका खडकावर बसून ध्यान केले. व्यंकटेश त्यांच्याकडे अनिमिष नेत्रांनी पहात होता. काही वेळाने त्यांनी डोळे उघडले त्यांच्या डोळ्यात तेज आले होते. चेहरा उजळला होता. व्यंकटेशच्या मनात काहीतरी गोंधळ चालू असल्याची चाहूल त्यांना लागली. नदीच्या गुडघाभर पाण्यात ते चालत गेले. त्यांनी व्यंकटेशलाही आपल्याजवळ बोलावले. व्यंकटेश त्यांच्या पाठोपाठ निघाला.

ते स्वत:शीच काहीतरी पुटपुटत होते व्यंकटेश जवळ येताच त्यांनी त्याला विचारले ''तुला संसार करायचाच का?'' आपल्या मनातील विचारच वडिलांच्या तोंडून निघाल्यामुळे व्यंकटेश चपापला. पण आता तो शांत, स्थिर होता. त्याने क्षणाचाही विलंब न करता उत्तर दिले, ''नाही.'' वडिलही आनंदी झाले. आपली मनातील अपूर्ण राहिलेली इच्छा आपला व्यंकटेश पूर्ण करील याचा त्यांना अभिमान व समाधान होते. लगेचच त्यांनी पुढचा प्रश्न केला, ''मग तू जगात कसा राहशील?'', व्यंकटेश उत्तरला, ''भिक्षा मागून राहीन.'' या प्रश्नोत्तरानंतर शेजारी उभ्या असलेल्या व्यंकटेशला एक वेगळाच अनुभव येत होता. पिता-पुत्रामध्ये आसक्तीची रेषाही उरली नव्हती. वडिलांनी व्यंकटेशला सोबत आणलेली फुले अर्पण करण्यास सांगितले आणि ते काही मंत्र म्हणू लागले. व्यंकटेशलाही त्यांनी एक मंत्र जपण्यास सांगितले होते. बरेच दिवस व्यंकटेश तो मंत्रजप करीत असे.

# बंडखोरी



व्यंकटेशच्या घरी जेमतेम परिस्थिती असली तरी आध्यात्मिक वातावरण होते. घरची सगळी मंडळी भावूक होती. संन्याशी, साधू किंवा बैरागी यांच्या जवनक्रमाविषयी व्यंकटेशच्यामनात लहानपणापासून आकर्षण असले तरी, देवळात जावे, मूर्तीची पूजा करावी, एखादा नवस करावा, असे त्याला कधीच वाटले नाही. घरात एखादा धार्मिक कार्यक्रम असला तर तो घराबाहेर जात असे. एखाद्या बाह्य संस्कारातून माणूस पवित्र होतो, यावर त्याचा विश्वास नव्हता. त्यापेक्षा आंतरीक शक्तीची पूजा करावी, ध्यानधारणा करावी, दीन-दुबळ्यांना मदत करावी. विरक्त जीवन जगावे, हीच खरी पूजा आहे, असे त्याला वाटे.

व्यंकटेश लहानपणापासून प्रेमळ होता. त्याला रंजल्या-गांजल्याविषयी, कामगार-मजूर लोकांविषयी खूप आस्था वाटे. लहानपणापासून संन्याशाचे पोर म्हणून हिणवणूक झाल्याने तो मितभाषी झाला. त्यामुळे आपल्या भावना तो बोलून दाखवत नसे. एखादी गोष्ट आवडली नाही, तर तो तेथे थांबत नसे. एखादी गोष्ट आपल्या अंगाशी येत असेल, तर तो त्याचा निकराने लढा देत असे. त्याबाबतीत तो दृढनिश्चयी, निष्ठुर होता. एकदा सोलापुरला काकाच्या घरी उत्तराधिमठाचे मध्वाचार्य आले होते. घरात मोठा कार्यक्रम ठेवला होता. सगळ्या खेडगीकर कुटुंबियांनी मध्वाचार्यांकडून तप्तमुद्रा घेतल्या. व्यंकटेश तप्तमुद्रा घेण्यास तयार नव्हता. तो पळून जात असताना त्याचा पाठलाग करुन पकडून आणण्यात आले. त्याने तप्तमुद्रांवर आपला विश्वास नाही असे सांगून त्या घेण्यास सक्त नकार दिला. त्याला हे सर्व स्तोम वाटले. जी गोष्ट आपल्या बुद्धीला पटत नाही, ती करु नये, असे तो म्हणाला. पकडून आणल्यामुळे तो खूप आरडाओरड करत होता. कोणाचेही तो ऐकत नव्हता. तो पळून जाण्याचा प्रयत्न करीत होता. सगळ्यांना वाटत होते की, हा आता वाया गेला आहे. म्हणून त्यांनी त्याला सोडून दिले.

# देशप्रेमाचा अंकुर

प्राथिमक शिक्षणानंतर व्यंकटेश पुढील शिक्षणासाठी सोलापूरला आला. त्याचे चुलते रामराव यांनी त्याला नॉथेकोट हायस्कूलमध्ये प्रवेश दिला. पहिले महायुद्ध सुरु होते. व्यंकटेशचे मन युद्धाच्या बातम्यांकडे आणि देशातील राजकीय घडामोंडीकडे लागलेले असे.

सोलापूरचे जिल्हाधिकारी दर आठवड्याला व्यंकटेशच्या शाळेत येवून प्रार्थना मैदानावर विद्यार्थ्यांना युद्धातील घडामोडींची माहिती देत. दोस्त राष्ट्राचे उद्दिष्ट किती चांगले आहे आणि जर्मनीचे क्रौर्य किती भयंकर आणि विदारक आहे, हेच मुलांच्या मनावर ठसविण्याचा त्यांचा प्रयत्न असायचा. व्यंकटेशला ते आवडायचे नाही.

युद्धखर्चासाठी युद्ध रोखे खरेदी करण्याची सक्ती विद्यार्थ्यांना केली जात असे. या अन्यायाविरुद्ध आवाज उठवावा, असे व्यंकटेशला नेहमी वाटत असे. त्याला आणखी एका गोष्टीची चीड येत असे, ती म्हणजे प्रार्थना मैदानावर शाळा सुटल्यानंतर कलेक्टरच्या हस्ते मुलांना युनियन जॅकचे झेंडे वाटत असत. त्यासोबत दिलेल्या खाऊच्या पुड्यामुळे विद्यार्थी झेंडा घेण्यासाठी गर्दी करत असत. व्यंकटेशला हे सर्व पाहून अतीव दु:ख होत असे. मुलांच्या भावनेशी खेळ होत आहे, असे त्यांना वाटे.

त्याने आपली ही खंत आपल्या वर्गमित्रांना बोलून दाखविली. सर्वांना व्यंकटेशचे म्हणणे पटले. याविरुद्ध आवाज उठविण्याचे ठरले. सर्वजण पेटून उठले. दुसऱ्या दिवशी झेंडा घेतल्याबरोबर फेकून द्यायचा आणि पायदळी तुडवायचा असे व्यंकटेश व त्यांच्या मित्रांनी ठरविले. ठरल्याप्रमाणेच घडले मुलांच्या या कृतीने मुख्याध्यापक रागाने लाल झाले. समोर पडलेली एक छडी त्यांनी उचलली आणि व्यंकटेश व त्याच्या मित्रांना चोप दिला. मुलांच्या अंगावर छड्यांचे वळ उठत होते. पण त्यातील एक जणही मागे हटला नाही.

ब्रिटिश ध्वजाबाबतची चीड व्यक्त करुन देशप्रेमाचा अंकुर, आपल्या मित्रांच्या मनात फुलविण्याचे काम व्यंकटेशने केले होते. त्यातच त्याचा विजय होता. शिक्षेखातर बसलेल्या छड्यांच्या वेदना या देशभक्तीच्या खोलवर रुजलेल्या अंकुरापेक्षा कितीतरी पटीने फिक्या पडल्या होत्या.

# लोकमान्यांचे दर्शन




लोकनेता म्हणून लोकमान्य टिळकांकडेच पाहिले जात होते. साहजिकच व्यकटेशचेही ते आदर्श होते. व्यंकटेश नेहमी त्यांचे लेख वाचत असे, त्यांचे विचार ऐकत असे. त्यावर विचार करत असे. त्यांचे विचार व्यंकटेशला आपलेसे वाटत. त्यांच्या विचारांनी आणि देशभक्तीने व्यंकटेश भारावून जात असे. त्यांना भेटावे, त्यांच्याशी बोलावे, असे व्यंकटेशला नेहमी वाटत असे. तसा योगही लवकरच आला.

एप्रिल १९२० च्या प्रारंभी महाराष्ट्र प्रांतिक परिषद सोलापुरात भरणार होती. टिळक येणार होते. परिषदेचे अध्यक्षपद नरसिंह चिंतामण केळकर स्वीकारणार असले तरी मुख्य आकर्षण होते लोकमान्य टिळकच! परिषदेला आलेल्या पुढाऱ्यांची जाहीर भाषणेही होती. लोकमान्यांना पाहण्याची व त्यांचे भाषण ऐकण्याची तीव्र इच्छा व्यंकटेशला आणि त्याच्या मित्रांना होती. त्यांची वार्षिक परीक्षा चालू होती. खरे म्हणजे लोकमान्यांचे भाषण ज्या दिवशी होणार होते तो शनिवार होता आणि नेहमीच्या वेळापत्रकाप्रमाणे शनिवाराचा पेपर सकाळीच होता. मुख्याध्यापक सी.एन्. नाबरांनी मुद्दाम त्या दिवशीचा पेपर दुपारी ठेवला. मुलांना व्याख्यानाला जाता येऊ नये यासाठी हे सगळे! दुपारी ३ वाजता पेपर होता. विज्ञान विषयाच्या या प्रश्न पत्रिकेमधील चांगले, सोपे, येतील तेवढे २-३ प्रश्न घाईने सोडवून चार वाजता परीक्षा कक्षामधून पसार व्हायचा बेत ठरला. व्यंकटेश व त्याचे मित्र त्याप्रमाणे पेपर देऊन लोकमान्यांच्या भाषणाला वेळेवर हजर झाले. त्यांचे भाषण ऐकून भारावून गेले. लोकमान्यांना पाहिल्याचा, त्यांचे भाषण ऐकल्याचा एक अपूर्व आनंद सर्वांच्या चेहऱ्यावर झळकत होता.

व्यंकटेशच्या अंगात तर एक वेगळे चैतन्य सळसळू लागले होते. मुख्याध्यापकांनी मुले बाहेर जाताना पाहून सहा वाजण्यापूर्वी कोणीही परीक्षा कक्ष सोडू नये, असा तातडीचा आदेश काढला. पण वेळ निघून गेली होती. व्यंकटेश व त्याच्या मित्रांनी संधी साधली होती. पण हे साहस त्यांना भारी पडू शकले असते, विशेषतः व्यंकटेशला! त्याला शाळा व वस्तीगृहाच्या नादारी सवलतीस मुकावे लागले असते. तरीही त्यांनी लोकमान्यांच्या प्रेमापोटी एवढी मोठी जोखीम पत्करली होती आणि ती दुसऱ्या दिवशीच्या छडीचा प्रसाद आणि दिवसभराच्या शिक्षेने टळली होती. ही शिक्षा त्या सर्वांनी हसत भोगली होती, कारण त्या बदल्यात त्यांना थोर देशभक्ताचे दर्शन आणि त्यांचे विचार ऐकण्यास मिळाले होते.

# प्रतिज्ञा

१ ऑगस्ट १९२० रोजी असहकारितेच्या चळवळीस प्रारंभ होणार होता. परंतु २० जुलै पासूनच टिळकांची प्रकृती बिघडली. त्यांना न्युमोनिया झाला. मुंबईच्या सरदार गृहात ३१ जुलैची मध्यरात्र उलटून गेल्यावर लोकमान्यांचे निधन झाले. सारे राष्ट्र शोकसागरात बुडाले. व्यंकटेशच्या मनावर याचा फार मोठा आघात झाला. नुकतेच झालेले लोकमान्यांचे दर्शन त्याच्या मनात ताजे होते. व्यंकटेशला इतर विद्यार्थ्यांपेक्षा राजकीय घडामोडींची जाण जास्त असल्याने लोकमान्यांच्या निधनाची प्रतिक्रिया अधिक तीव्र व वेगळी होती. ती इतरांप्रमाणे केवळ दु:खाची नव्हती. व्यंकटेशच्या आदर्शांचा एक तारा निखळला होता. अशा वेळी त्याला वाटू लागले, ''मी सामान्य मार्ग आक्रमू की भारतमातेच्या सेवेसाठी माझे जवीन अर्पण करु? गृहस्थाश्रम स्वीकारुन पती व पिता बनू की ब्रह्मचारी राहून माझी शक्ती देशकार्यासाठी वेचू? संततीला जन्म देऊन त्यांचे संगोपन करीत बसणे हे सध्याच्या परिस्थितीत कितपत योग्य ठरेल?''

अशी विचारांची खळबळ त्याच्या मनात माजली होती. त्याचे मन फार हेलावून गेले होते. त्याचे मित्रही फार अस्वस्थ होवून गेले होते, विशेषत: एकनाथ गोडबोले! दु:खाचा आवेग कमी झाल्यावर पुढील आयुष्यात मातृभूमीसाठी काहीतरी केले पाहिजे, असा निश्चय दोघांनी केला. दुपारी लोकमान्यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी भरलेल्या सभेत ते दोघे गेले. शोक सभेतील मान्यवरांच्या भाषणाने व्यंकटेश भान हरवून बसला. त्याने दिवसभर उपवास केला.

सभा आटोपल्यावर एकनाथला घरी सोडून व्यंकटेश सिद्धेश्वराच्या तळ्याकडे गेला. तेथे पायऱ्यांवर बसून तो खूप वेळ रडला. त्याला बाकी सर्वांचा विसर पडला. तो अगदी विमनस्क बनला होता. कित्येक वेळ तो तसाच बसून राहिला. सूर्य अस्तास चालला होता. अचानक काहीतरी घडले. वीज चमकावी तसा व्यंकटेश उठला, त्याने दोन्ही हाताच्या ओंजळीत पाणी घेतले. मावळत्या सूर्याच्या व सिद्धेश्वराच्या साक्षीने अर्ध्य दिले आणि अगदी मनोभावे त्याने प्रतिज्ञा केली, ''या क्षणपासून माझे पुढील जीवन मी पूर्णपणे मातृभूमीच्या सेवेसाठी अर्पण करीन. सर्वसंगपरित्याग करुन आजन्म ब्रह्मचारी राहीन.'' असे म्हणून तो ध्यानमग्न झाला. तेव्हापासून त्याचे जवीनच बदलले. सारी तळमळ शांत झाली. जीवन त्यागमय आणि सेवामय बनवण्यासाठी तो झपाटल्यागत प्रयत्न करु लागला.

# साहसी देशप्रेम




व्यंकटेशचे माध्यमिक शिक्षण सोलापुरच्या नॉर्थकोट हायस्कूलमध्ये चालू होते. ते सरकारी हायस्कूल होते. तेथे देशप्रेमाच्या निदर्शक असलेल्या सर्व गोष्टींवर बंदी होती. गांधीजींचा स्वातंत्र्य संग्रामातील हा पदार्पणाचा काळ होता. व्यंकटेश आपोआपच त्यांच्याकडे आकर्षित झाला.

व्यंकटेशच्या शाळेत राष्ट्रप्रेमी व गांधी विचारांना विरोध होता. गांधीटोपी घालण्यासाठी शिक्षक परवानगी देत नव्हते. व्यंकटेश व त्याचे मित्रमंडळ राष्ट्रप्रेमाने पुरते झपाटलेले होते. त्यांनी गांधीटोपी घालून वर्गात बसायचे ठरवले. प्रत्येकाने एक एक गांधीटोपी विकत घेतली. दुसऱ्या दिवशी संपूर्ण वर्गात गांधीटोप्या दिसू लागल्या. बातमी कळताच मुख्याध्यापक एक लांब छडी घेऊन वर्गात आले व सर्वांना त्यांनी टोपी काढण्यास फर्मावले. वर्गनायक म्हणून व्यंकटेशने उभे राहून सांगितले, ''गांधीटोपी घालण्यात काहीच गैर नाही व ती आम्ही काढणार नाही.'' मुख्याध्यापकांनी छडीचा प्रसाद प्रथम व्यंकटेशला दिला आणि नंतर इतरांना छड्या खाव्या लागल्या, पण कोणीही डगमगले नाही. उलट यामुळे विद्यार्थ्यांचे देशप्रेम आणि ऐक्य आणखीनच दृढ झाले. व्यंकटेशचा आत्मविश्वास तर यामुळे खूपच वाढला. त्याने देशभक्तांच्या व क्रांतिकारकांच्या गोष्टी वाचून इतरांना सांगण्याचा धडाकाच लावला. पुढे तर शाळा सोडून मातृभूमीच्या सेवेसाठी प्रतिज्ञाबद्ध होण्याचा त्याने निर्णय घेतला. घरोघरी जाऊन वर्गबंधूंचे मन वळवण्यात आले. त्यांनी एक युवक मंडळही स्थापन केले. दर आठवड्याला या मंडळाची बैठक होऊन त्यात चर्चा, वादविवाद इ. कार्यक्रम होऊ लागले.

एक सभा घेऊ त्यात शाळा सोडण्याचा निर्णय जाहीर करायचे ठरले. सभेसाठी न.चि. केळकरांना बोलवण्यात आले. त्यांचे भाषण अतिशय ऱ्हृदयस्पर्शी झाले. त्यांनी मुलांना निर्णय जाहीर करण्यास सांगितले, पण व्यंकटेशशिवाय कोणीही उठून प्रतिज्ञा घेतली नाही.

# निर्धार

व्यंकटेशने शाळा सोडून मातृभूमीशी कृतज्ञ राहण्याचा निर्णय घेतल्याचे जाहीर केल्यावर विद्यार्थ्यांनी खूप टाळ्या वाजवल्या, पण दुसऱ्या दिवशी कोणीच उठून अशी शपथ घेतली नाही. उलट दुसऱ्या दिवशीपासूनच पूर्वी खूप उत्साह दाखविणारे त्याचे मित्रच व्यंकटेशला शाळा सोडू नये, भावनेच्या भरात वाहून जावू नये, असा सल्ला देऊ लागले. या त्यांच्या कृतीने व्यंकटेश खूप दु:खी झाला. त्याला आपण एकटे पडत आहोत, असे वाटत होते. पण तरीही तो डगमगला नाही. त्याने आपला निर्धार पक्का केला. त्याच्यावर पडलेल्या जबाबदारीची त्याला जाणीव होती. हे काम आता खूप खडतर होत जाणार, याची त्याला कल्पना येऊ लागली.

दरम्यानच्या काळात काही क्रांतिकारकांनी खाजगी शाळा सोडण्याच्या कार्यक्रमाविषयी बोलण्यास सुरु केले. त्यामुळे व्यंकटेशचे मनोबल वाढत होते. त्याच्या मुख्याध्यापकांनीही त्याला शाळा न सोडण्याबद्दल सल्ला दिला. चाचणी परीक्षा होऊन गली होती. व्यंकटेशचे परीक्षा आवेदन पत्रही पाठवण्यात आले होते. त्याने मुंबई मॅट्रिकच्या परीक्षेत बसावे, म्हणून मुख्याध्यापकांनी खूप प्रयत्न केले. पण व्यंकटेशने ते अजिबात मानले नाही. तो कडाडला, ''मी देवासमोर आणि सर्वांसमोर प्रतिज्ञा केली आहे. ती मी पाळणारच.''

व्यंकटेशने कोणत्याही धोक्याला न घाबरता शाळा सोडून दिली. आपण देवासमोर घेतलेली प्रतिज्ञा प्रामाणिकपणे पाळू शकलो, याचा त्याला खूप आनंद झाला. या घटनेने त्याचा आत्मविश्वास आणि मनोबल खूप वाढले. त्या घटनेतून त्याला विविध गोष्टी शिकता आल्या. मित्रांचे स्वाभाव, क्रांतिकारकांचे विचार, हिंतचिंतकाची ओळख याचे त्याला जवळून दर्शन झाले. आपण आपलाच आतील आवाज ऐकून त्याला साद दिल्याबद्दल व्यंकटेशला अत्याधिक आनंद झाला होता. प्रत्येकाच्या अंतर्यामी पवित्र आणि पूजनीय अशी एक शक्ती वास करत असते व तिच्या आदेशाचेच पालन करावे आणि यावरच श्रद्धा ठेवावी, हा विचार व्यंकटेशच्या मनात अधिकच खोलवर रुजला गेला.




# दिनक्रम

अमळनेरला व्यंकटेशचा दिवस पहाटे साडेतीनलाच सुरु होई. लगेच तो व्यायाम करत असे. चार वाजता थंड पाण्याने स्नान झाले की, आपल्या टेबलाशी बसून गीतेचा संपूर्ण पाठ तो म्हणे. पुढे पुढे तर प्राचार्य गुण्यांच्या सांगण्यावरून तो गीतेचे वाचन अर्थ समजून घेवून करु लागला. व्यंकटेशचा आवाजही थोडा बऱ्यापैकी होता. कबीर, तुलसीदास व सुरदास यांची पदे तो गात असे. कधी मोरोपंताची केकावलीही म्हणे. थोडावेळ ध्यान करुन महाविद्यालयीन विषयाचा अभ्यास करी.

सकाळी नऊ वाजता भोजनाची घंटा होई. भोजनानंतर लगेच महाविद्यालयाचे तास सुरु होत. व्यंकटेश शिकण्यात तल्लीन होऊन जाई. शिकवलेले सर्व काही त्याच्या लक्षात राही. फावल्या वेळात ग्रंथालयात जाई. तेथील विषयांच्या पुस्तकांबरोबर तो संत चरित्रे, इतर साहित्य वाचत असे. महान पुरुषांच्या आणि क्रांतिकारकांच्या गोष्टी तर त्याचे आवडते विषय होते. गांधीजींच्या 'यंग इंडिया' या मासिकाचे लेख तर तो नेयमीत वाचत असे.

व्यंकटेशला लहानपणापासूनच अध्यात्माची आवड होती. आत्मशुद्धीकरणासाठी तो उपवास, प्रार्थना आणि पापनिवेदन या त्रिसूत्रीचा वापर करी. दर महिन्याला दोन एकादशा आणि प्रत्येक गुरुवार असा सहा दिवसांचा उपवास करी. याशिवाय एखाद्या दिवशी काही क्षोभकारक प्रसंग घडला तर तो दिवस उपवासाचा असे. आपल्याला निरागस बालकाप्रमाणे पावित्र्य प्रदान करावे, अशी ईश्वराला तो प्रार्थना करे.

पापनिवेदनाचा प्रकार तर त्याचा आगळाच होता. मला पापाच्या फळातून मुक्ती नको, पापवृत्तीतून, पाप-कर्मातून मुक्ती हवी, ही भावना पापनिवेदनाच्या माग असे.

दिवसभरात कितीही थकला असला तरी व्यंकटेश नियमितपणे दैनंदिनी लिहीत असे. दैनंदिनी म्हणजे निरंतराचा साथी आणि पापनिवेदनाचा ग्रंथच, असे त्याला वाटे. दैनंदिन लिखाण करताना तो पूर्वी कधी आणि रोजच्या जीवनात मनात आलेल्या पापी विचारांचा, आचारांचा हिशोब करत असे. तो स्वत:वर अगदी काळजीपूर्वक नजर ठेवून त्या सर्वांची दैनंदिनीत नोंद करत असे. मनात आलेल्या भारतमातेविषयीच्या भक्तीभावनांचीही नोंद करत असे.




# गांधीजींचा संदेश

असहकारितेच्या धोरणाचा प्रसार करण्यास सोलापूर आणि परिसरात नेहमी कोणी ना कोणी पुढारी येत असत. एकदा गांधीजी दक्षिणेतील कुठल्याशा शहराहून सोलापुरमार्ग मुंबईस जाणार होते. हे कळताच व्यंकटेशचा आनंद गगनात मावेना. कोणत्याही परिस्थितीत गांधीजींना भेटायचे त्याने ठरविले. त्याने आपल्या सर्व मित्रांना ही गोष्ट सांगितली. एवढ्या गर्दीत गांधीजींना कोण भेटू देणार होते? तरीपण त्याने धीर सोडला नाही. प्रयत्न तर करुन बघायचे होते. आपल्या काही मित्राबरोबर व्यंकटेश रेल्वे-स्थानकावर आला. एकच गर्दी उसळली होती. त्या सर्वांनीच त्या जनसागरात उडी घेतली. थोड्याच वेळात त्यांची एकमेकांपासून ताटातूट झत्तली. एवढ्या प्रचंड गर्दीत गांधीजींचे दर्शन होईल की नाही, याचाच व्यंकटेशच्या मनाला घोर लागलेला होता. तरीपण तो नेटाने पुढे चालत होता. एकदाचा ज्या रेल्वेने गांधीजी येणार होते, तिने स्थानकात प्रवेश केला. गांधीजी लोकांना अभिवादन करण्यासाठी दाराशी येऊन उभे राहिले होते. योगायोगोने गांधीजींचा डबा व्यंकटेश जेथे उभा होता तेथे आला. व्यंकटेशला अतिशय आनंद झाला. पटकन खाली वाकून त्याने गांधीजींच्या चरणांना स्पर्श करुन अभिवादन केले. गांधीजींनी त्याच्या पाठीवर थोपटले. व्यंकटेश डोळ्याची पापणीही न हटवता, ते क्षण आणि गांधीजींचे ते साधेसे रुप आपल्या डोळ्यात साठवून घेत होता. क्षणाक्षणाला प्रतीत होणारा गांधीजींचा साधेपणा व्यंकटेशला आकर्षित करत होता. गांधीजींचे दर्शन घेऊन तो बाजूला उभा राहिला.

''देश स्वातंत्र होईपर्यंत स्वस्थ बसू नका, कामाला लागा, त्यागाची तयारी करा. विद्यार्थ्यांनी अभ्यास सोडून खेड्यात जावे व हा संदेश पोंहचवावा चरखा चालवावा'', असे गांधीजींनी जमलेल्या लोकांना सांगितले गांधीजींचे शब्द जणू अमृतवाणीच आहे, असे समजून व्यंकटेश मोठ्या भक्तिभावाने आपल्या कानात साठवून ठेवत होता. आपण यासाठी काय करु शकतो? काय केले पाहिजे? हे विचार व्यंकटेशच्या मनात चालू होते. त्याच्या कानात गांधीजींची आर्जवता घुमत होती. त्यांच्या आवाहनाला प्रतिसाद देण्यासाठी काम करायचेच, असे मनोमन ठरवून तो घरी परतला.

# दैनंदिनी लेखन




व्यंकटेशची आर्थिक परिस्थिती केव्हाच चांगली नव्हती. अमळनेरला आल्यावर संस्थेच्या महाविद्यालयाच्या ग्रंथालयात तो तीन तास काम करी पण ते ही पैसे पुरत नसत. म्हणून त्याने सुटीतही काम केले. दुसरे वर्ष तर त्याहून बिकट गेले, तरीही त्याचे अभ्यासावरचे लक्ष जराही कमी झाले नव्हते. कामामुळे बुडालेला अभ्यास तो रात्री पूर्ण करीत असे. महाविद्यालयाने काही कारणावरून त्याची फी सवलत बंद केली. म्हणून व्यंकटेशने वसतिगृह व भोजनगृह सोडून दिले. महाविद्यालयापासून दूर, दोन मैलांवर तो एका अर्धवट पडलेल्या बंगल्यात राहू लागला. तेथे त्याच्याबरोबर गुरा-ढोरांशिवाय कोणीही रहात नसे. एका गुजराती बाईकडे तो जेवायला जाई. दिवसभर काम करुन व्यंकटेश थकून जाई. पण नियमित व्यायाम आणि मोकळी हवा, यामुळे त्याचे शरीर बलवान बनले होते.

दिवसाचे सारे काम आटोपल्यानंतर व्यंकटेश एक वही घेऊन टेबलाशी बसे व दिवसभरात मनात आलेले पापी विचार किंवा झालेल्या चुका त्या वहीत लिहून काढी. व्यंकटेशच्या पाप कल्पनेत फक्त पापी आचरण नव्हे, तर पापी विचारांचाही समावेश होता. पापवासना मनात सुद्धा येवू नये, अशी शुद्धता त्याला हवी होती. अमळनेरला येण्यापूर्वी हातून घडलेल्या, दुसऱ्याचे घड्याळ ठेवून घेण्याच्या मोहासारख्या चुकांचेही निवेदन या वहीत करी. पश्चाताप झालेला व्यंकटेश दैनंदिनी लिहिताना ओक्साबोक्शी रडत असे. एकदा रात्री असेच रडत असताना मानसशास्त्राचे प्राध्यापक मागे येऊन उभे राहिले. व्यंकटेशने लिहिलेला काही मजकूरही कुतूहलाने त्यांनी वाचला. त्याच्या मनाची निरागसता पाहून प्राध्यापकांच्याही डोळ्यात अश्रू आले आणि ते व्यंकटेशला तंद्रितून जागे करत म्हणाले, ‘होय! खरंच मित्रा, तू जिंकला आहेस.’ आपले हे पापनिवेदन व्यंकटेशने प्राचार्य गुण्यांनाही वाचायला दिले. दुसऱ्या दिवशी त्यांनी व्यंकटेशला बोलावून घेतले आणि म्हटले, ‘‘तू योग्य मार्गावर आहेस प्रयत्न चालू ठेव. मला जेवढे शक्य असेल तेवढे सहाय्य करण्यास मी येथे आहेच.’’ प्राचार्य गुणेही भक्तीपर पदे, भजने, म्हणत. त्या भजनांनी आध्यात्मप्रेमी व्यंकटेशला आपल्या अंत:करणाच्या तारा छेडल्यासारखे वाटे.




# मोल मैत्रीचे

व्यंकटेश सोलापुरला हायस्कूलमध्ये असताना त्याची एकनाथ गोडबोले नावाच्या एका मुलाशी मैत्री झाली. लवकरच ते एकमेकांचे जिवलग मित्र झाले. व्यंकटेश आपल्या जीवनातील आपण केलेल्या वाईट गोष्टींचे कथन एकनाथकडे करीत असे. त्यामुळे त्याच्या वागण्यात सुधारणा होत आहे, असे त्याला वाटे.

मॅट्रिकच्या परीक्षेसाठी व्यंकटेशने एका मित्राचे घड्याळ घेतले होते. पण नंतर घड्याळ्याच्या मोहात पडून ते हरवल्याचे कारण सांगून त्याने ते लपवून ठेवले. बरेच दिवस तो ते बाहेर काढू शकला नाही. त्यामुळे ते घड्याळ त्याच्या मनाची शांती हरवून बसले होते. ते घड्याळ आपल्या बहिणीकडे देवून यावे, या विचाराने व्यंकटेश ते मनगटावर बांधून रेल्वे स्थानकावर पोहचला.

पण दुर्दैवाने त्याच रेल्वेतून व्यंकटेशचा दुसरा मित्र उतरला आणि त्याने नेमके ''किती वाजले?'' म्हणून विचारले. व्यंकटेश घड्याळात पाहून ''सव्वा वाजला'', असे म्हणून पटकन गाडीत चढला आणि ते घड्याळ बहिणीकडे देवून आला. मध्यंतरीच्या काळात फलाटावर भेटलेल्या मित्राने, घड्याळवाल्या मित्राला ही माहिती सांगितली. पुढे बऱ्याच दिवसांनी व्यंकटेश, एकनाथ तो घड्याळवाला मित्र व प्लॅटफॉर्मवर भेटलेला मित्र असे फिरायला गेले असता, त्या घड्याळवाल्या मित्राने दरडावून घड्याळ मागितले. व्यंकटेशने त्याला कोपऱ्यात घेवून ''उद्या आणून देतो'' म्हणून सांगितले. एकनाथने या सर्व प्रकारची चौकशी केली. व्यंकटेशने त्याच्यापासून घडलेल्या घटना लपविण्याचा प्रयत्न केला. कबुलीप्रमाणे दुसऱ्या दिवशी त्याने ते घड्याळ घड्याळवाल्या मित्राला परत केले.

व्यंकटेश अमळनेरला शिकायला गेला त्याची सर्व मित्राशी ताटातूट झाली. पुढे तेथे राहून त्याने गांधीजींच्या विविध विचारांचा अभ्यास केला. तेव्हापासूनच त्याला त्याचे मन खात होते. आपण मित्राशी कृतघ्नपणे वागलो, याची खंत त्याच्या मनाला सतत जाणवत होती. त्यातच एकनाथने एकही पत्र व्यंकटेशला पाठवले नाही. आपण एका चांगल्या मित्राला दुरावलो आहोत,

याची बोचणी व्यंकटेशला लागली होती. तो कायम अस्वस्थ असे. आपण केलेल्या अशा मोठ्या पापाचे आपण प्रायश्चित्त करावे, असे त्याला वाटे. वेगवेगळ्या संघटनांचे प्रमुखपद व स्वयंसेवक असल्याने व्यंकटेश निरनिराळ्या ठिकाणी गांधीजींच्या विचारांवर भाषणे देत असे. गांधीजींच्या 'आत्मशुद्धी' या विषयांवर तो भाषण देत असे. आपले बोलणे आणि वागणे यातील परसपरविरोधी प्रकाराने व्यंकटेशला जीवनाचा उबग येऊ लागला. एकदा गांधीजींच्या भाषणाच्या कार्यक्रमाची व्यवस्था व्यंकटेशकडे होती. त्यामुळे आत्मशुद्धीचे विचार त्याला खूप जवळून ऐकता व पाहता आले. यामुळे व्यंकटेश फारच प्रभावित झाला. तो खूप अंतर्मुख होऊन विचार करु लागला.

आत्मशोध आणि आत्मशुद्धी हे दोन मार्ग त्याला समोर दिसत होते. व्यंकटेशला लबाडी आणि ढोंगीपणाचा प्रचंड तिरस्कार वाटू लागला; त्याच्या मोहापायी त्याने आपल्या सर्वात जवळच्या मित्राला गामवले होते. त्याच्या विरहाने तो तासन् तास खिन्न होऊन बसे. व्यंकटेशने आपल्या पापाचे प्रायश्चित्त घ्यावयाचे ठरवले. आपलीच चूक होती म्हणून आपणच क्षमा मागावी, या विचाराने व्यंकटेशने एकनाथला पत्र लिहिले. व्यंकटेशने घडलेली संपूर्ण हकीकत अत्यंत अपराधीपणाच्या भावनेने लिहिली. त्यात त्याने कित्येक वेळा माफ करण्याविषयी याचना केली होती. पत्र पूर्ण होईपर्यंत तो नुसता खिन्न होता. व्यंकटेशने एकनाथला लिहिले, ''जोपर्यंत मी तुझ्या मैत्रीच्या लायक मला वाटत नाही, तोपर्यंत मी तुला भेटणार नाही. माझी पूर्ण आत्मशुद्धी झाली आहे असे जोपर्यंत मला वाटत नाही तोपर्यंत मी तुला तोंड दाखवणार नाही.''

मित्राने लिहिलेले हे भावपूर्ण पत्र वाचून, त्याला झालेला पश्चाताप पाहून एकनाथचे मन भरुन आले. त्यालाही आपण मित्राशी अबोला धरल्यामुळे अत्यंत खेद वाटू लागला. तो ते पूर्ण पत्र वाचेपर्यंत रडत होता. आपल्या मित्राच्या विरहाने व्याकूळ झालेल्या एकनाथनेही लगेच व्यंकटेशला पत्र लिहिले आणि त्यांचा अबोला संपला.





# जडण घडण

अभ्यासक्रमासाठी नेमलेल्या विषयांव्यतिरिक्त त्या त्या विषयात उपलब्ध असलेली पुस्तके तर व्यंकटेश वाचत असे, शिवाय महाविद्यालयाच्या ग्रंथालयातील इतर पुस्तकेही तो वाचून काढी. पुस्तके वाचावयाची, वाचताना त्याची टिपणे काढावयाची व नंतर टिपणे वाचून त्याचे मनन करावयाचे, अशी त्याची पदध्त होती. करमणुकीच्या पुस्तकांना मात्र तो हात लावत नसे. आध्यात्मिक क्षेत्रातील महापुरुषांचे जीवन व विचार हा त्याचा जास्त आवडीचा विषय होता. देशहिताच्या तळमळीने भारलेल्या विवेकानंदांच्या जीवनाचे त्याला महत्व पटले होते. पंजाब प्रांतातील गुजराणवाला जिल्ह्यातले एक संन्यासी स्वामी रामतीर्थ, यांचे चरित्रही त्याने वाचले. गणित विषयात एम्.ए. ची पदवी घेतल्यावर अध्यात्माकडे वळलेल्या व अवघ्या ३३ वर्षाचे आयुष्य लाभलेल्या रामतीर्थांच्या ज्ञानाचे त्याला आकर्षण वाटे. महाविद्यालयाच्या ग्रंथालयात असलेले रामतीर्थांच्या लेखन, भाषणांचे "In Woods Of God Realization' त्याने अनेक वेळा वाचून काढले.

पुण्यात आल्यावर एक वर्षाने व्यंकटेशचा ‘वाङमय विशारद’ या पदवी परीक्षेसाठीचा अभ्यासक्रम पूर्ण झाला. त्यानंतर राजनीतीशास्त्रात एम्.ए. ला समकक्ष असलेली ‘वाङमय - पारंगत’ ही पदवी मिळवण्यासाठी टिळक विद्यापीठातच अभ्यास चालू केला. या पदवीसाठी व्यंकटेशने ‘लोकशाहीचा विकास’ हा प्रबंध लिहिला. पुण्यातील राहणीमान आणि तेथील विविध विचारसरणी, याने व्यंकटेशचे जीवन उजळून निघत होते. त्याचप्रमाणे पुण्याला त्याकाळात विविध पुढाऱ्यांच्या सभा होत. त्यामुळे व्यंकटेशची विचारधारा आणखीनच प्रगल्भ होत चालली होती. आवडत्या नेत्यांची भाषणे, भेटी झाल्यामुळे दुधात साखरच पडली होती. अमळनेरला व्यंकटेशचा आध्यात्मिक व मानसिक घाट घडला होता, तर पुण्यातील त्याच्या वास्तव्याने त्याचे बौद्धिक व्यक्तित्व साकार झाले होते.




# गांधीजींविषयीचा पूज्यभाव

व्यंकटेश अमळनेरला असतानाच १९२२ साली गांधीजींना राष्ट्रद्रोहाच्या आरोपाखाली ६ वर्षाची शिक्षा झाली होती. त्यांना पुण्यात येरवडा तुरुंगात ठेवण्यात आले होते. १९२८ च्या जानेवारी महिन्यात पुण्यात बातमी पसरली की, गांधीजी अत्यवस्थ असून त्यांच्यावर शस्त्रक्रिया करण्यासाठी त्यांना ससून रुग्णालयात ठेवण्यात आले होते. त्यांच्यासाठी आपण काहीतरी करावे, असे त्याला सारखे वाटत होते. पण काय करणार? गांधीजींचे आपण दर्शन घ्यावे असे सगळ्याप्रमाणे व्यंकटेशलाही वाटत होते. पण फारच निवडक व्यक्तींना रुग्णालयातील त्यांच्या खोलीत प्रवेश मिळत होता. त्यामुळे व्यंकटेशला त्यांचे दर्शन होणे अशक्यच होते.

अचानक तो योग जुळून आला. गांधीजींना भेटण्यासाठी आलेल्या काँग्रेस अध्यक्ष मौलाना महमद अलींचे विद्यार्थ्यांसमोर भाषण होणार होते. विद्यार्थी संघाचा अध्यक्ष म्हणून व्यंकटेश सभेचा अध्यक्ष होता. भाषणानंतर मौलाना गांधीजींना भेटण्यास जाणार होते. ''मी तुमच्याबरोबर येवू का?'' अशी कळकळीची विनंती व्यंकटेशने त्यांना केली. त्याच्या डोळ्यातील कळकळ आणि वाणीतील आर्जवता पाहून मोलानांनाही नाही म्हणवले नाही. ससून रुग्णालायाच्या एका लहानशा खोलीत गांधीजी होते. दार उघडताच व्यंकटेश दारातच थांबला. महंमद अली आत गेले आणि गांधीजींच्या पायावर कोसळून रडू लागले. व्यंकटेशचे मनही भरून आले. त्याचे डोळे पाण्याने डबडबले होते. शेजारी उभे असलेले डॉक्टर आणि जेलचे अधिकारी यांच्याही डोळ्यात अश्रू होते. महंमद अलींच्या मनातील गांधीजींविषयीचा पूज्यभाव व्यंकटेश डोळ्यात साठवून घेत होता.

एवढ्या मोठ्या नेत्यांचा एकमेकांविषयीचा इतका स्नेहभाव व्यंकटेश प्रथमच पहात होता. मौलाना स्वत:ही फार कनवाळू होते. तसेच गांधीजींच्या विचार व वागण्यातील कळकळ, मैत्रीसंबंध हेच मौलानांच्या या सौहार्दपूर्ण वागण्यातून प्रतीत होत होते. या भावपूर्ण प्रसंगाचा व्यंकटेशच्या मनावर खूप खोलवर परिणाम झाला. त्यांच्या ठायीची कणवता आणखीनच दृढ झाली.

# कामगार चळवळ

व्यंकटेशचे टिळक महाराष्ट्र विद्यापीठातील शिक्षण 'वाङ्मय-पारंगत' पदवीनंतर संपणार होते. पुढे करावयाच्या कामाचा विचार व्यंकटेशच्या मनात चालू होता. अशावेळी वृत्तपत्रातील एका जाहिरातीकडे त्याचे लक्ष गेले. भारतातील संघटित मजूर चळवळीचे जनक नारायण मल्हार जोशी यांना एक सहायकाची गरज होती. त्याची निवड करण्यासाठी त्यांनी एक अभिनव मार्ग शोधला होता. 'भांडवल आणि श्रम' या विषयावर त्यांनी इच्छुकांकडून निबंध लिहून मागवले होते. त्या निबंधाच्या गुणवत्तेच्या आधारे ते निवड करणार होते.

व्यंकटेशला एका नव्या क्षेत्रात काम करण्याची संधी मिळण्याचा संभव दिसला. त्यांनी निबंध लिहून पाठवला. 'वाङ्मय-पारंगत' चा निकाल लागण्यापूर्वीच जोशींनी त्यांची निवड केली. पारंगतची परीक्षा आटोपताच एप्रिल १९२६ मध्ये ना.म. जोशींच्या 'टेक्सटाईल लेबर युनियन' नावाच्या कापड-गिरणी कामगारांच्या संघटनेत मुंबई शहराचे 'उपसंघटक' म्हणून व्यंकटेश खेडगीकर रुजू झाले.

कुर्ला भागात गिरणी कामगार संघाचे कार्यालय होते. कुर्ल्यापासून परळ लालबागपर्यंत अत्यंत अपुऱ्या व गलिच्छ जागेत कामगार रहात. या कामगारांची संघटना बांधावयास खेडगीकरांना घरोघर जावे लागे. एखाद्या ओलसर काळोख्या खोलीत एकाच वेळी तीन-तीन, चार-चार कुटुंबे रहात असत. त्यांच्या वाट्याला आलेलं अमानवी व करुणास्पद जीवन खेडगीकरांना अस्वस्थ करी. त्याच भागात एका खोलीत खेडगीकर रहात. खोलीवर रात्री आले म्हणजे जे पाहिले त्यामुळे अस्वस्थ झालेल्या खेडगीकरांना बराच वेळ झोप येत नसे.

कामगारांना गिरणीतही कोणतेही संरक्षण नसे. मालक यांना केव्हाही काढून टाकू शकत. स्त्री कामगारांना सवलती तर सोडाच, परंतु विविध प्रकारच्या छळवणुकीस तोंड द्यावे लागे. कामगार वैतागले म्हणजे कधी कधी गडबड करत असत. मालक पोलिसांना बोलावत. पुढील प्रसंग टाळण्यासाठी खेडगीकरांसारखे कार्यकर्तेधावून जात, कामगारांना समजावीत. त्यामुळे खेडगीकर हे कामगार व मालक यांच्यातील भांडणे मिटवण्यासाठी प्रसिद्ध झाले होते. कामगार चळवळीत काम करत असताना इतरही अनेक नेत्यांबरोबर खेडगीकरांचा संबंध आला. त्यातलेच एक एस्.एच्. झाबवाला हे पारशी ग्रहस्थ. ते 'कामगार' हे रेल्वे कामगारांसाठी साप्ताहिक काढत. खेडगीकर साप्ताहिकांच्या संपादनास मदत करत असत. आर.आर. बखले हे मुंबई गिरणी कामगार संघात खेडगीकरांचे वरिष्ठ होते दोघांचे चांगलेच जुळले होते. ब्रिटिश संसदेचे एक हिंदी सभासद एल्.बी. सकलातवाला भारतात आले असताना त्यांचा खेडगीकरांशी संबंध आला. त्यांच्या भाषणातील जहालपणा व तळमळ यांचा खेडगीकरांवर फार मोठा परिणाम झाला. तसेच त्यांच्या भाषणातील 'राष्ट्राच्या जीवनात श्रमजीवी मनुष्य अत्यंत महत्त्वाचा आहे' या विचाराने खेडगीकर अतिशय प्रभावित झाले.

# पक्षाघात

१९२७ च्या जानेवारी महिन्याच्या प्रारंभी जोशींनी खेडगीकरांना दिल्लीला बोलावून घेतले. कामगार विषयक विधेयक तयार करण्यासाठी माहिती गोळा करण्याच्या कामी व अखिल भारतीय मजूर सभेच्या अधिवेशनाची तयारी करण्याच्या कामी त्यांना जोशींना मदत करायची होती. खेडगीकरांना नेहमी बाहेर फिरावे लागे. ते तहानभूक विसरुन काम करत असत. जानेवारी आणि फेब्रुवारी असे दोन्ही महिने दिल्लीत कडाक्याची थंडी होती. खेडगीकरांजवळ लोकरीचा एकही गरम कपडा नव्हता. केवळ दोन खादीचे पोशाख घेऊनच ते आले होते. तेथे झालेल्या अवकाळी पावसाने थंडी अधिक बोचरी झाली. तरीपण खेडगीकरांचे काम अविरत सुरुच होते. त्याचा व्हायचा तोच परिणाम झाला.

अचानक त्यांना आपले पाय थोडे जड झाल्यासारखे वाटू लागले. चालताना त्रास होऊ लागला. त्यांच्या पाठीच्या कण्यातील मज्ञातंतूवर थंडीचा परिणाम झाला. त्यांनी जोशीना हे सांगून दिल्ली सोडण्याची परवानगी मागितली. लवकरात लवकर मुंबई गाठायची होती. परंतु ताजमहाल पाहिला नाही. म्हणून ते त्यासाठी थांबले आणि यात दिल्लीतले दिवस वाढले आणि पर्यायाने दुखणेही. मुंबईपर्यंत पोहचेपर्यंत दुखणे आणखी वाढले होते. मुक्कामावर कसेबसे पोंहचल्यावर लक्षात आले की, चलनक्रिया नियंत्रित करणारे मज्ञातंतू निकामी झाले आहेत आणि कमरेखालचा संपूर्ण भाग लुळा झला आहे. मज्ञातंतुविकाराचे मुंबईतील ख्यातनाम तज्ज्ञ डॉ. काँट्रॅक्टर यांनी त्यांना तपासले. एक जबरदस्त धक्का खेडगीकरांना बसला, अवघ्या २४ व्या वर्षी ऐन तारुण्यात खेडगीरांना पक्षाघात झाला होता. डॉक्टरांनी काही औषधे आणि थोडासा दिलासा देऊन सांगितले की, आता दुखणे संपूर्णत: बरे होणार नाही. म्हणजेच ते आता आयुष्यभर अपंग राहणार होते. तरीपण हिंमत न हरता खेडगीकरांनी मोठ्या धाडसाने आपल्यासमोर पडलेल्या अथांग आयुष्याला तोंड द्यायला स्वत:ला मानसिकरित्या सुदृढ केले.

# वैचारिक परिवर्तन




डॉक्टारांनी पक्षाघाताला मुंबईचे वातावरण हानिकारक असल्यामुळे लवकरात लवकर मुंबई सोडण्यास खेडगीकरांना सांगितले. आयुर्वेदाचा उपचार करावा म्हणून खेडगीकर वैद्य पू.ग. नानल यांच्या आयुर्वेद रुग्णालयात दाखल झाले. तेथेही त्यांची प्रकृती सुधारत नव्हती. शेवटी  त्यांच्या मित्रांनी अहमदनगरला वैद्य पंचानन गुणे यांच्या महाविद्यालयात उपचार करण्याचे ठरवले. तेथे त्यांना थोडे बरे वाटू लागले. ''मी पूर्ण बरा होईन,'' असा विश्वास ते बोलून दाखवू लागले. थोड्या व्यायामाने पायात थोडी शक्ती येत होती. जवळपास दीड वर्ष आजारपण होते. मित्रभेटी शिवाय त्यांचा इतर सारा वेळ एकांतवासात जाई. पडून राहिलेल्या खेडगीकरांच्या मनात चाललेल्या विचारांनी त्यांच्यात मुळातच असलेला संन्यस्तवृत्तीची जोपासना झाली. जीवनाचा आणि जगन्नियंत्या शक्तीशी असलेल्या नात्यांचा अर्थ समजून घेण्यास या चिंतनाची मदत झाली. प्रारंभी आपल्याला झालेल्या विकारामुळे आलेल्या नैराश्याने मन भरुन जाई, परंतु हळूहळू हे नैराश्य कमी झाले. त्यांनी अभ्यासिलेली भगवद्गीता आणि रामतीर्थांचे व विवेकानंदाचे लेखन, त्यांचे सतत मनात घोळणारे स्मरण यांनी या काळात खूप साथ दिली. या प्रदीर्घ काळात खेडगीकरांना अंतर्मुख होऊन अंतर्निरीक्षण करुन जीवनाचा अर्थ समजावून घेण्याची संधी मिळाली. 'तू म्हणजे शरीर नव्हेस,' असे स्मरण त्यांना गीता करुन देई, तर विवेकानंद सांगत, ''मग या आजारपणाची चिंता कशाला? ईश्वरेच्छेला शरण जा.'' खेडगीकर अशावेळी डोळे मिटून घेत आणि पूर्णपणे परमेश्वराला शरण जात असत. त्यांना स्वत:चा विसर पडे. आत्मा अमर आहे, अशी स्वामी रामतीर्थांची वाणी त्यांना ऐकू येई. त्यांना

वाटे, मरण म्हणजे तरी काय? आध्यात्मिक प्रगतीच्या दिशेने पडणारे एक पाऊलच आहे. ‘गोविंद, गोविंद’ म्हणत असताना किंवा त्याची सेवा करत असताना आपल्याला मृत्यू यावा असे त्यांना नेहमी वाटे.

आजारपणाविषयी त्यांना हळहळ वाटली नाही. चांगला धट्टाकट्टा, निरोगी राहूनही आंतरिक चारित्र्य अन् भक्तिभाव जर विकसित करु शकलो नसतो तर त्यांचा काय उपयोग झाला असता? असे त्यांना वाटे. ते शरीराने पंगू झालेले असले तरी आत्माच अति मौल्यवान आहे, हे त्यानी जाणले होते. शारीरिक दृष्टीने त्यांची जितकी हानी झाली होती, त्या हानीच्या हजारपटीने आत्मलाभ त्यांना झाला होता. आजारपणाची छत्रछाया धरुन प्रखर असे आत्मज्ञान जाणून दिल्याबद्दल ते नेहमी त्या जगन्नियंत्याचे आभार मानत असत. आजारपणानंतर खेडगीकराचा आत्मविश्वासरुपी संजीवनीच्या बळावर पुनर्जन्म झाला होता.

# कारावास - १




१९२८ च्या ऑगस्ट महिन्यात खेडगीकरांची रुग्णालयातून सुटका झाली. लगेच ते सोलापुरला आले. खेडगीकर येण्यापूर्वीच सोलापुरमधील चार महिने चाललेला कामगारांचा संप निवळला होता पण कामगारांची व्यवस्थित संघटनाही बांधलेली नव्हती. गिरणी मालकांचा कामगाराकडे पाहण्याचा दृष्टिकोनही बदलला नव्हता. यामुळे त्यांचे प्रश्न अनुत्तरीत राहिलेले होते. कामगारांकडे आत्मीयतेने पाहणारे, त्यांच्यावर होणाऱ्या अन्यायाविरुद्ध बोलणारे कुणीच नव्हते. गिरण्याही नीट चालत नव्हत्या. कामगारही काही दिवस कामावर जात तर काही दिवस जात नसत. त्यामुळे सर्व कामगारांच्या घरी हलाखीचे दिवस आले होते.

पोलिसांकडून सभा मिरवणुका आणि असहकार यांना प्रतिबंध करण्यात आला होता. अशा वेळी गिरण्यांसमोर शांततेने निदर्शने करुन कायदेभंग करावयाचा असे ठरवण्यात आले. या निदर्शनाचे नेतृत्व आपोआपच खेडगीकरांकडे आले. कामगारांविषयीचा कनवाळुपणा व आपलेपणा त्यांना गप्प बसू देत नव्हता. खेडगीकर या कामगारांच्या विरोधी धोरणाचे, सत्याग्रहाचे, नेतृत्व करणार ही बातमी साऱ्या सोलापुरात पसरली. फार मोठ्या संख्येने सोलापुरचे नागरिक हा कामगारांचा अभिनव सत्याग्रह पाहण्यास जमले. पोलिसांनाही त्याची चाहूल लागली होती. ते तयारीतच होते. निदर्शन सुरु होताच ते तिथे धडकले आणि त्यांनी खेडगीकरांना अशांतता माजविणे आणि कामगारांना भडकविणे, या आरोपाखाली अटक केली.

खेडगीकरांना न्यालयालयात आणले. त्यांना कोर्टात हजर करण्यात आले. खेडगीकरांनी स्वत:च आपली बाजू मांडली. त्यांनी सांगितले ''जर

कामगारांच्या अधिकारांविषयी लढणे गुन्हा असेल तर तो मी केला आहे. तुम्ही द्याल ती शिक्षा मला मंजूर आहे.'' न्यायाधिशांनी त्यांना होणाऱ्या शिक्षेची कल्पना खेडगीकरांना दिली. 'मोडेन पण वाकणार नाही' ह्या बाण्यामुळे न्यायाधिशांनाही काहीच करता आले नाही. गुन्हा कबूल केल्यामुळे खेडगीकरांना सहा दिवसांची साध्या कैदेची शिक्षा झाली. नुकतेच प्रदीर्घ आजारातून उठलेल्या खेडगीकरांच्या प्रकृतीकडे पाहून न्यायाधिशांनी त्यांना विशेष बाब म्हणून भाकरी ऐवजी भातच देण्याचा आदेश दिला. मिळणारा भातही खेडगीकरांना संपवणे शक्य होत नव्हते. त्यातील बराचसा भात ते इतर कैद्यांना देत. त्यांची त्या काळात बऱ्याच कैद्यांशी मैत्री झाली. पण त्यांना या काळात खूप काही सहन करावे लागले.

तरीसुद्धा या शिक्षेनंतरही कामगारांच्या पदरी काहीच पडू शकले नाही, याचेच त्यांना वाईट वाटले.




# मुख्याध्यापक

संप अयशस्वी झाल्याने खेडगीकर निराश मन:स्थितीत होते. एके दिवशी हिप्परग्याच्या शाळेत काम करण्याविषयी त्यांचे मेव्हणे भीमराव जोशी यांचे पत्र आले. शाळा व परिसर पाहून त्यांनी निर्णय घेण्याचे ठरविले. देशसेवेचा एक चांगला मार्ग म्हणून खेडगीकरांनी हे काम करण्याचे मान्य केले. तेथे काम करण्यासाठी खेडगीकरांना आपली मानसिक तयारी खूप करावी लागली. त्यांनी मनाशीच ठरविले होते, 'ज्या बाबतीत संचालक व आपण यांच्यात एकमत होईल तेवढ्याबाबत जीव ओतून काम करावयाचे आणि जेथे मतभेद होईल त्या बाबतीत लक्षच घालवयाचे नाही.'

तेथील माळावरचे वातावरण खेडगीकरांना चांगले मानवणारे होते. शाळेच्या मुख्याध्यापकाचे काम स्वीकारण्याचे ठरवले, तेव्हा वेतनाच्या अपेक्षेबाबत संचालकांनी त्यांना विचारले. ''पगारी नोकर म्हणून कामाची आपल्याला सवय नाही, सामान्य माणसाचे साधे जीवन जगण्यासठी किमान गरजा भागण्यासाठी आवश्यक असतील तेवढे पैसे पुरेत'', असे त्यांनी सांगितले. खेडगीकरांना एकट्याचाच संसार होता. स्वत:चा खर्चही खूप कमी होता. ते स्वत:ची सर्व कामे स्वत:च करत, संचालकांनी सांगितले, ''दरमहा पन्नास रुपये त्यांच्या नावावर जमा होतील. गरजेनुसार खेडगीकर त्यातून पैसे काढू शकतील.''

खेडगीकरांकडे एका वळकटीशिवाय काही नव्हते. पोशाखही साधा स्वदेशीच. खादीचा सदरा, चुडीदार पायजमा आणि डोक्याला गांधीटोपी. दोन जोड होते. हातात एक काठी असे. ती रुबाबासाठी नसून पक्षाघाताने दुबळ्या झालेल्या पायांना आधार देण्यासाठी असे. लाकडी फर्निचर तर झोपडीतही

नव्हते आणि वर्गातही. वर्गात विद्यार्थी तरटावर तर शिक्षक चौपदरी घोंगडीवर बसत. खेडगीकरांनी त्यातही वळकटीचा त्याग करुन अंथरावयाला व पांघरावयाला अशा दोन घोंगड्या वापरायला सुरुवात केली. विजारीच्या जागी लुंगी आली. चहा, कॉफीसारखी पेये तर कधीच सोडून दिली होती. खेडगीकरांची शाळेच्या भोजनगृहातच भोजनाची सोय केली होती. शाळेच्या आवारातच ते एका झोपडीत रहात. त्यामुळे इतर काही खर्चच नव्हता. एकदाच एका आजारी नातेवाईकाला भेटायला जाण्यासाठी या संचित रकमेतून त्यांना किरकोळ रक्कम काढावी लागली. हा अपवाद वगळता खेडगीकरांनी वेतनाची रक्कम कधी उचललीच नाही. कमीत कमी गरजा आणि नैसर्गिक साधनसंपत्तीचा उपयोग करुन जीवन कसे सुकर होते, याचे चांगले उदाहरण खेडगीकरांनी घालून दिले होते. त्यात त्यांचा व्यायाम, योग, संयम यांचाही मोलाचा वाटा होता. त्यामुळे त्यांची प्रकृतीही दिवसेंदिवस सशक्त बनत होती. शाळेतील सहकाऱ्यांना तर आदर्श जीवन पद्धतीचा जीताजागता नमुनाच पाहायला मिळत होता. त्यामुळे खेडगीकरांच्या व्यक्तिमत्वाचा आणि त्यांच्या राहणीमानाचा अप्रत्यक्ष परिणाम भोवतालच्या परिस्थितीवर जाणवू लागला होता. बाबासाहेब परांजपे व त्यांच्यासारखे सेवाव्रतीवृत्तीने पछाडलेले शिक्षक तयार होणे, हे त्याचेच फलित होते.

# मातृहृदयी शिक्षक




खेडगीकरांनी मुख्याध्यापक म्हणून वरच्या वर्गाला इंग्रजी शिकवायला घेतले. मॅट्रिकच्या वर्गात चार मुले होती. त्यांना बोलावून चाचणी घेतली तेव्हा इंग्रजी विषय सगळ्यांचाच कच्चा असल्याचे दिसले. आठवी-नववीतही वेगळी परिस्थिती नव्हती. तेव्हा खेडगीकरांना खूप मेहनत घ्यावी लागणार, याचा अंदाज आला. ते स्वत: खूप अभ्यास करत. टिपणे काढून पूर्वतयारी करुन शिकवत असत. कारण परिश्रमाशिवाय काहीच पर्याय नव्हता. ते शिकवताना वेगवेगळे प्रयोग करीत. मुलांकडून गृहपाठ करुन घेत. वर्गाप्रमाणेच ते विद्यार्थ्यांना चारभिंतीबाहेर नेऊन चाकोरीबाहेरील ज्ञान व माहिती मुलांना देत. त्यामुळे ते मुलांना आवडू लागले.

मुख्याध्यापक असल्याने त्यांना बऱ्यावाईट प्रसंगांना सामोरे जावे लागे. तेव्हा कधी कधी मुलांना शिक्षा करण्याचा प्रसंग त्यांच्यावर येई, तो त्यांना सर्वात कठीण संकटाचा काळ वाटे. ते शक्य तो शारीरिक शिक्षा करत नसत. परंतु गंभीर चुकांच्यावेळी त्यांचा नाईलाज होई. असेच एकदा एका विद्यार्थ्याला तीन छड्या मारण्याचे त्यांनी ठरवले. काळजावर दगड ठेऊन त्यांनी हा निर्णय घेतला होता. ते कृत्य करताना मन धजावत नव्हते. मग त्यांनी या कृत्याला आपणच जबाबदार आहोत, असे ठरवून अगोदर स्वत:लाच तीन छड्या मारुन यातना अनुभवल्या. मग विद्यार्थ्याला छड्या मारल्या. मात्र असे करुनही खेडगीकरच विद्यार्थ्यांच्या गळ्यात पडून ओक्साबोक्शी रडू लागले. त्यानंतर त्यांनी विद्यार्थ्यास शिक्षा म्हणून स्वत:च उपोषण करण्यास प्रारंभ केला. एक उपोषण तर चांगले चार-पाच दिवस झाले याचा विद्यार्थ्यांवर जबरदस्त परिणाम झाला. विद्यार्थी त्या चुका पुन्हा करत नसत.

खेडगीकरांना विद्यार्थ्यांविषयी अतिशय प्रेम वाटे. विद्यार्थी हे उद्याचे उज्ज्वल भविष्य आहेत, तेच देश घडवणार आहेत, असे खेडगीकरांना वाटे.

# सेवक संघ

हिप्परग्यात एक सेवक संघ होता. अनंतराव कुलकर्णी त्याचे प्रमुख होते. संन्यासवृत्तीची लहानपणापासूनच ओढ असलेले खेडगीकर तिकडे न जातील तरच नवल! सेवकसंघ स्वत:ला स्वामी रामतीर्थांचे शिष्य मानत असत. खेडगीकर शाळेव्यतिरिक्त वेळ मिळेल तेव्हा तिकडे जात असत.

खेडगीकरांना सेवकसंघात प्रवेश देताना अनंतराव कुलकर्णी म्हणजे सर्वांच्या काकांनी त्यांना विचारले, ''परमेश्वरासाठी तू सर्वस्वाचा त्याग करायला तयार आहेस काय?'' क्षणाचाही विलंब न करता खेडगीकरांनी होकारार्थी उत्तर दिले. लगेच दुसरा प्रश्न ''तू भिक्षेवरती राहू शकशील?'' खेडगीकरांनी त्यालाही तयारी दर्शविली. अशा रीतीने सेवक संघात प्रवेश हा त्यांच्या संन्याशाश्रमाची नांदीच ठरला. त्यांच्या जवळ परित्याग करण्यासारखे काहीच नव्हते. एक फाटक्या ओव्हरकोटाशिवाय जास्तीचे कपडे नव्हते, शाळेत त्यांच्या खात्यात शिल्लक असलेली पगाराची सर्व रक्कम त्यांनी शाळेच्या गरीब विद्यार्थी फंडाला देणगी म्हणून देवून टाकली. सेवक संघातील वावरण्याने आणि त्यांच्या दानीवृत्तीने त्यांनी लवकरच काकांसह सर्वांची मने जिंकली. काकांना तर त्यांच्या भावी आयुष्याची चाहूल लागली होती.

१४ जानेवारी १९३०, मकर संक्रातीचा दिवस. खेडगीकर पहाटे तीनलाच उठले. त्यांनी ध्यान केले. जीवनाच्या मार्गाविषयी आपल्या मनात कितपत निष्ठा आहे, याची चाचपणी केली आणि आपल्या प्रामाणिकपणाविषयी खात्री करुन घेतली. सकाळी सात वाजता काही मित्रमंडळी जमली. अमृतरायांचे एक पद खेडगीकर नेहमी म्हणत, तेच त्यांनी म्हटले

अशाश्वत संग्रह कोण करी?
चिरगुट चिंध्या जोडुनी कंथा गोधडी हीच बरी
कोण करी घर, सोपे, माड्या, झोपडि हीच बरी
नित्य नवे जे देईल माधव, भार ते चि घरी
अमृत म्हणे मज भिक्षा डोहळे, येती अशा लहरी

नंतर मित्रांसोबत गावात भिक्षा मागण्यास त्यांनी प्रारंभ केला. मिळालेली भिक्षा तळ्याकाठच्या नृसिंहाच्या मंदिरात बसून सेवन करत. त्यातील थोडे सायंकाळसाठी राखून ठेवत. याप्रमाणे रोजचा क्रम सुरु ठेवला. रोज मिळालेल्या भिक्षेवरच निर्वाह करायचा आणि शाळेचे काम करायचे. भिक्षेचे सेवन करण्यासाठी कधी नृसिंहमंदिरात तर कधी मारुतीच्या मंदिराचा आश्रय घ्यावा लागे. येथे एखादा साधू, संन्यासी आला असेल तर त्याचबरोबर भिक्षा ग्रहण करायची आणि त्यांची सेवा करायची, असा खेडगीकरांचा दिनक्रम होता.

# संन्यासाश्रम

हिप्परग्याच्या वातावरणात अध्यात्म आणि राष्ट्रप्रेम याची घालण्यात आलेली सांगड खेडगीकरांच्या मनोभूमिकेला जुळणारी होती. साधू व संन्याशी यांचे फार आकर्षण होते. विरक्त जीवनाविषयी कुतूहल होते. मात्र त्याबरोबरच निरुत्साही व आळसयुक्त जीवन, त्यांना मान्य नव्हते. देशाच्या सेवेसाठी आयुष्य खर्च करण्याचा निर्णय पूर्वीच झाला होता. त्या कामासाठी संन्यासाश्रम अधिक उपयुक्त होईल, असे वाटत होते. स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ यांचे आदर्श समोर होते. या दोघांचे लेखन अमळनेर, पुण्यात शिक्षणाच्या काळात वाचण्यात आले. गीतेचा पाठ ते नियमित करत.

अनाश्रित: कर्मफलं कार्यं कर्म करोति य:।
स सन्न्याशी च योगी च न निरग्निर्न चाक्रिय:॥

भावार्थ: ज्याने अग्निहोत्रासारखी कर्मेसोडून दिली व जो निष्क्रीय जीवन घालवतो आहे तो योगी किंवा संन्याशी नसतो तर ज्याने कर्माच्या फलांची आशा धरलेली नाही तो खरा संन्यासी. ही संन्याशाची व्याख्या त्यांना मनोमन पटली होती.

स्वत:च्या स्वार्थासाठी न जगता आपले तन-मन-धन जो समाजाच्या हितासाठी वापरतो आणि स्वत: अनासक्त व विकारमुक्त रहातो तो खरा संन्याशी, असे खेडगीकर मानत होते. संन्यासीवृत्तीने आपली बुद्धी व शक्ती देशहितासाठी अर्पण करणे हीच ईशोपासना आह; हे रामतीर्थांच्या 'राष्ट्रधर्म' या लेखातील विचार त्यांना मार्गदर्शक वाटायचे; संन्यास घ्यायची इच्छा प्रबल होत चालली होती. वेदान्ताला निवृत्तीकडून प्रवृत्तीकडे वळवणारे व समाजाभिमुख दृष्टीने आत्मिक उन्नतीची सामाजिक उन्नतीशी सांगड घालणारे रामतीर्थ त्यांना अनुकरणीय वाटत होते. आपली ही इच्छा खेडगीकरांनी सेवक संघाचे प्रमुख अनंतराव कुलकर्णी यांच्या कानावर घातली. त्यांनी अत्यंत आनंदाने संमती दिली. संन्यास घ्यायचा असेल तर तो स्वामी रामतीर्थांच्या एखाद्या शिष्याच्या हातून घ्यावा, असे ठरले. रामतीर्थांचे पट्टशिष्य नारायणस्वामीना लखनौ येथील 'रामतीर्थ असोसिएशन लिग' च्या पत्त्यावर पत्र लिहिले. योगायोगाने ते पत्र स्वत: नारायणस्वामीनींच उघडले आणि केव्हाही तिकडे येण्याचे निमंत्रण दिले. खेडगीकरांचा आनंद गगनात मावेनासा झाला. त्यांना आता संन्यास घ्यायचे वेध लागले होते.

# संन्यासग्रहण




१४ जानेवारी १९३२ हा मकर संक्रांतीचा दिवस खेडगीकरांच्या संन्यास दिक्षा ग्रहणासाठी ठरला. नारायणस्वामी दहा-बारा दिवस अगोदरच हिप्परग्यास आले होते. या दिवशी खेडगीकर लवकर उठले. त्यांच्या चेहऱ्यावर एक वेगळेच तेज दिसत होते. त्यांनी सर्व विधी आटोपून देवाचे स्मरण केले. समाधी लावली. दीक्षाविधीची वेळ आणि स्थळ अगोदरच ठरले होते. हळूहळू ती वेळ जवळ येत होती. खेडगीकर नेहमी मूकपणे ज्या ओढ्याकाठी चिंतन करीत, त्याच औदुंबर वृक्षाखालची जागा दीक्षेसाठी स्वामींनी निवडली.

भल्या सकाळीच नारायणस्वामी व खेडगीकर दीक्षाविधीसाठी नियोजित जागेकडे निघाले. त्यांच्या मागोमाग खेडगीकरांचे सोलापूर, सिंदगी, जेवरगी, गाणगापूर अशा वेगवेगळ्या ठिकाणांहून आलेले नातेवाईक, सेवकसंघातले सहकारी व काकासाहेब, शाळेतील शिक्षक विद्यार्थी व जवळपास सगळे गाव ओढ्याकडे जावू लागले. एखाद्या मिरवणुकीसारखी प्रभातफेरी निघाली होती. खेडगीकर आणि त्यांचे सहकारी त्यांच्याचेहऱ्यावर एक वेगळाच आनंद दिसत होता, तर खेडगीकरांच्या नातेवाईकांच्या चेहऱ्यावर दु:खाचे सावट दिसत होते. काही जणांच्या डोळ्यातून तर अश्रुधारा ओघळत होत्या.

नारायणस्वामींनी ओढ्याच्या आलीकडे सर्वांना थांबवले. ओढ्याच्या पलीकडे जाऊन नारायणस्वामींनी अगोदर स्वत:चे मुंडण करवून घेतले व नंतर खेडगीकरांचे मुंडण करवले. नंतर ते ओढ्याच्या पात्रात एक छोटा डोह होता, तेथे खेडगीकरांना घेऊन गेले. ओंकाराचा उच्चार सुरु करुन त्यांनी खेडगीकरांचा हात धरला. हात धरल्यावर एका दिव्यशक्तीचा संचार आपल्यात




होत आहे, असा अनुभव खेडगीकरांना होत होता. नारायणस्वामींनी डोहातील पाण्यात डुबकी मारली. नंतर त्या पाण्यात उभे राहून ते खेडगीकरांना म्हणाले, ''आजपासून तू परमेश्वराचा झालास. आता सर्व विश्व हेच तुझे कुटुंब आहे.'' खेडगीकर बराच वेळ तसेच डोळे मिटून त्या थंडगार पाण्यात उभे होते. एक वेगळीच शक्ती आपल्यात प्रवेश करत आहे, असे त्यांना जाणवत होते, ते थंडगार पाणीही त्यांना गरम वाटत होते. बाहेर आल्यावर नारायणस्वामींनी लखनौहून खास आणलेली भगवी वस्त्रे दिली आणि ती त्यांनी परिधान केल्यावर त्याला सांगितले, ''आजपासून तू 'स्वामी रामानंद तीर्थ' म्हणून ओळखला जाशील.''

# समाज दर्शन

संन्यासग्रहण दीक्षाविधी नंतर नारायस्वामी परत गेले. मात्र त्यांचा व स्वामी रामानंद तीर्थांचा अधूनमधून पत्रव्यवहार चालूच होता. रामतीर्थ जयंतीच्या कार्यक्रमासाठी लखनौला येण्याचे निमंत्रण रामानंदांना त्यांनी दिले होते, तसेच संन्यासवृत्तीची, विरक्त जीवन पद्धतीची आवड असल्याने स्वामी रामानंद तीर्थांची जीवनातही गोडी वाढली होती. ते राग, लोभ यापासून दूर चालले होते. तरीपण नारायणस्वामींचे निमंत्रण त्यांनी रामतीर्थांवरील प्रेमापोटी स्वीकारले.

स्वामी रामानंदांच्या बरोबर सत्यवानजी नावाचे सैन्यातील एक कनिष्ठ अधिकारी मुंबईपर्यंत येणार होते. मद्रास रेल्वेमधून कल्याण स्थानकावर दोघे उतरले. सत्यवानजी मुंबईची तिकिटे काढण्यासाठी स्थानकाबाहेर गेले. पहाटे पाचसव्वा पाचची वेळ होती. फलाटावर फारसे लोक नव्हते. रामानंद तीर्थ एकटेच फलाटाच्या बाकावर शांतपणे बसले होते. ते विचारांत गढून गेलेले असताना एका इंग्रज पोलिसाने त्यांना असभ्यपणे हटकले. तो म्हणाला, ''महाराज, बाहेर चला'', स्वामीजी हलले नाहीत. ते पाहून त्याने तोच हुकुम पुन्हा सोडला. याचाही काहीच उपयोग झाला नाही तेव्हा पोलीस खुपच चिडला. मात्र त्याने काहीच उपयोग झाला नाही तेव्हा पोलीस खुपच चिडला. मात्र त्याने पुढे काही करण्याअगोदर सत्यवानजी परत आले. त्यांनी आपल्या लष्करी पेशाला साजेशा पद्धतीने त्या पोलिसाची हजेरी घेतली. त्यानंतर पोलिसाच्या डोक्यात प्रकाश पडला की, हा संन्याशी कोणी भणंग भिकारी नाही, तर तो एक महान पुण्यात्मा आहे.

मुंबईच्या स्थानकावर उतरल्यापासून रामानंद तीर्थांना

संन्यासाश्रमाचे नवनवे बरेवाईट अनुभव यावयास सुरुवात झाली. रस्त्याने जाणारे येणारे विशेषत: उत्तर प्रदेशातील भक्तमंडळी त्यांना आदराने नमस्कार करीत. मुक्कामी पोहोचल्यावर त्यांनी मुंडण करुन घेण्याची इच्छा व्यक्त केली. तेव्हा एक न्हावी बोलावण्यात आला. त्याने आपल्याजवळचे आसन अंथरुन तयारी केली. त्या आसनावर स्वामीजी जाऊन बसल्यावर तो चपापला. त्याला वाटले की हा कसला अपशकुन आज झाला? तो हिय्या करुन म्हणाला, ''मला अगोदर दुसऱ्या कोणाची तरी हजामत करावयाची आहे.'' धंद्याची भोवनी करताना प्रथम संन्यासाची हजामत करणे त्याला अपशकुनच वाटला. स्वामीजी आसनावरुन उठले. दुसऱ्या कोणाची तरी हजामत झाल्यावर स्वामीजींचे काम त्याने केले. या प्रसंगातून समाजाचा संन्याशाकडे पाहण्याचा दृष्टिकोन स्वामीजींना कळून आला.




# अंबाजोगाईस आगमन

१९३५ च्या मार्च महिन्यात स्वामीजी अंबाजोगाईस आले. या गावाला कोकणस्थांची कुलस्वामिनी असलेल्या योगेश्वरी देवीमुळे पडलेले 'अंबाजोगाई' हेच नाव आहे. स्वामीजी योगेश्वरी मंदिराच्या आवारातच राहू लागले. मुकुंदराज व दासोपंतांचे कार्य पाहून ते थक्क झाले. त्यांची पदे, कवने पाठ करुन गाऊ लागले. त्यांचे लेख, विवेकसिंधू, गीतार्णव सारखे ग्रंथ यासारख्या साहित्यिक संपत्तीचा अभ्यास करायला त्यांनी सुरुवात केली. या दोन्ही महात्म्यांच्या समाधीकडेही स्वामीजीं नेहमी जात असत. दासोपंत समाधीजवळील 'नृसिंहतीर्थ' तर स्वामीजींची आवडती जागा होती.

हळूहळू स्वामीजींनी गावातील प्रमुख मंडळींना भेटावयास सुरुवात केली. त्यांना स्वामीजी आपली भूमिका पटवून सांगत. ''जर नवीन शाळा काढली तर आपण आपल्या मुलाना पाठवाल का?'', असे ते विचारत. स्वामीजींच्या व्यक्तिमत्वाचा आणि वाणीतील आर्जवतेचा इतका प्रभाव पडे की, समोरचा त्यांना नकार देवू शकत नसे. पण शाळेला परवानगी नाही तेव्हा कायदेभंग ठरु शकेल व पालकांना त्याची झळ लागू शकेल, याची त्यांना स्पष्ट जाणीव दिली होती. त्यामुळे तर लोकांना त्यांच्याविषयी जास्तच आपुलकी व विश्वास वाटू लागला.

अशा कठीण परिस्थितीतही पंधरा-वीस पालक आपली मुले शाळेत पाठवण्यास तयार झालेच. एक नि:स्वार्थी संन्यासी शाळा काढू इच्छितो व घरोघर मुले पाठवण्याची विनंती करतो, ही गोष्टच गावातील सुसंस्कृत लोकांच्या मनात सहानुभूती व धैर्य निर्माण करणारी होती. एखादी तरी शाळा सुरळीत चालावी, हाच स्वामीजींचा हेतू होता. जर तो साध्य झाला तर आपण खूप काही करु शकू, याची स्वामीजींना जाण होती. स्वामीजी वेगवेगळ्या गावी जाऊन निरनिराळ्या लोकांना भेटून शाळेविषयी बोलत, त्यावर चर्चा करत. नवीन शाळेला परवानगी मिळत नसल्याने एखादी जुनीच शाळा व्यवस्थितपणे चालवण्याचा स्वामीजींनी विचार केला.

# योगेश्वरी नूतन विद्यालय

'योगेश्वरी नूतन विद्यालय' नावाची एक शाळा अंबाजोगाईस १९१८ साली सुरु झाली. पण तिचीही परिस्थिती खूपच हलाखीची होती. स्वामीजी शाळेच्या चालक मंडळाला भेटले. स्वामीजींनी शाळेचे नूतनीकरण करुन हायस्कुलचे वर्ग काढावे, असे सुचवले. आपण व आपले काही सहकारी शाळेत शिकविण्यास तयार आहोत, असे सांगितले. त्यांच्या प्रस्तावाला चालकांनी सहमती दिली. स्वामीजींनी मुख्याध्यापकपद स्वीकारले.

थोड्याच दिवसांनी बाबासाहेब परांजपेही अंबाजोगाईस आले. स्वमीजी, नारायराव जोशी, व बाबासाहेब हे सर्वजण गावातील प्रमुख नागरिकांना भेटून मुलांना शाळेत पाठवण्याची विनंती करु लागले तसेच संस्थेचे सभासद होऊन तिला मदत करण्याचीही विनंती करु लागले. लोकांचाही आता या मंडळींवर चांगलाच विश्वास बसला होता.

५ मे १९३५ रोजी अक्षयतृतीयेच्या दिवशी 'योगेश्वरी नूतन विद्यालय' च्या पुनरुज्जीवनाचा व आठव्या वर्गाचा शुभारंभ झाला. मुहुर्ताच्या दिवशी शाळेत ८६ जणांनी प्रवेश घेतला. वर्षअखेरीस ही संख्या २७५ वर गेली. जागा पुरेना म्हणून प्राथमिक विभाग मंगळवार पेठेत हलवण्यात आला. विजयादशमीच्या दिवशी शाळेत सरस्वती पूजनाचा कार्यक्रम झाला. विद्यार्थी, शिक्षक व पालक आणि गावातील प्रमुख नागरिक कार्यक्रमासाठी जमले होते. शाळेच्या कामासाठी पंधरा हजारांचा निधी उभारण्यासाठी स्वत: नारायणरावांनी एक हजार रुपये देवून लोकांनाही आवाहन केले.

नारायणरावानंतर स्वामीजी बोलण्यास उभे राहिले. त्यांनी एकदा सर्वांकडे एका करुण नजरेने पाहिले. त्यांच्या डोळ्यात शाळेविषयी चिंता

दिसत होती. ते म्हणाले, ''मी आणि बाबासाहेब यांच्या जवळ शाळेला देणगी देण्यासारखे धन नसले तरी आमचे तन आणि मन मात्र राजकीय आणि सामाजिक कार्यासाठी पूर्वीचे अपर्ण केले आहे. या शाळेचे कार्य त्याचा एक भाग आहे. तुम्ही सर्वांनी या आमच्या कार्याला आशीर्वाद दिला पाहिजे.'' बोलताना स्वामीजींचा कंठ दाटून आला होता. आपल्या भाषणाच्या शेवटी त्यांनी, ''मी या शाळेच्या कार्याला पूर्ण वाहून घेत आहे.'' असे म्हणून श्रोत्यांना अक्षरश: साष्टांग नमस्कार घातला. संन्याशाने कोणाला नमस्कार घालायचा नसतो. त्यालाच सर्वांनी वंदन करायचे असते. इथे मात्र उलटेच घडत होते. सर्वांचीच अंत:करणे हेलावून गेली. सर्वजण एकामागून एक उभे राहिले आणि एक हजाराच्या देणग्या जाहीर करु लागले. त्याकाळी ही रक्कम फारच मोठी होती.

# ''आम्ही मुले बिघडवतो!''

अंबाजोगाईला आल्यापासून स्वामीजी रामतीर्थांची जयंती साजरी करु लागले. त्या दिवशी वसतिगृहावर भजने, व्याख्याने यासारखे विविध कार्यक्रम आणि सहभोजन होत असत. शाळेत ब्राह्मणेत्तर शिक्षक आणि विद्यार्थीही होते आणि त्यांचे एकत्र जेवण होत असे. गावातील काही सनातनी विचाराची मंडळी ह्या विचाराने थोडी नाराज झाली. अगोदरच स्वामीजी प्रचलित शिक्षणाशिवाय चाकोरीबाहेरचे ज्ञान आणि कौशल्ये शिकवित, म्हणून पालक वर्गात थोडी कुरकुर होती. त्यात ह्या प्रकाराचीही भर पडली होती. आपल्या मुलांवर असे धर्मविरोधी संस्कार स्वामीजी व त्यांचे सहकारी करत आहेत, या विचाराने ते अस्वस्थ होते. हे सर्व स्वामीजींना कळल्यावर त्यांनी वातावरण थोडे निवळू दिले. सुमारे महिनाभराने त्यांनी गावातील प्रतिष्ठितांची बैठक बोलावली. ''जातीपातींनी केलेले भेद आपण मानत नाही आणि या भेदांनी निर्माण केलेली सामाजिक व्यवहारातील बंधनही आपणास मान्य नाहीत'', हे त्यांनी स्पष्टपणे सांगितले. आपल्या विचारांशी प्रतारणा करुन शाळा चालवणे आपल्याला अशक्य असल्याचे त्यांनी खुलेपणाने स्पष्ट केले.

हैद्राबाद संस्थानाच्या बाहेर, देशात, माणसामाणसातील समतेवर आधारलेले नवे विचार अधिक मोकळपणाने मांडले व आचरले जात आहेत याची त्यांनी विविध उदाहरणे देऊन आली भूमिका स्पष्ट केली. स्वामीजींच्या मनात सर्वाप्रती असलेला समानतेचा भाव त्यांच्या वागण्यातून आणि बोलण्यातून वेळोवेळी प्रकर्षाने जाणवत होता. त्यांच्या निरपेक्ष विचारांचाही प्रत्यय यातून येत होता. जातीपातीचे भेद व अस्पृश्यता यांचा त्याग करण्याची वेळ आली आहे. मोकळ्या मनाने समताधिष्ठितनवविचार समजून घ्या, असे

आवाहन करतानाच त्याँी आणखी एक आवाहन केले. ते म्हणाले, ''आमची शाळा विद्यार्थ्यांना नवविचारांचे महत्त्व पूटवून देईल, परंतु कोणत्याही विचारांची सत्ती मात्र करणार नाही.'' स्वामीजींच्या अतिशय भावपूर्ण व प्रांजळ भाषणाने त्यांचा निश्चय दृढ केला. बाबासाहेब कडाडले, ''होय, आम्ही तुमची मुले बिघडवतो. त्यांना माणसांमाणसातल्या भिंती तोडायला शिकवतो. त्यांना प्रत्येकाच्या हृदयातला माणूस ओळखायला शिकवतो.''

सामाजिक समता हा स्वामीजींच्या जिव्हाळ्याचा विषय होता. त्यांच्या परखड पण जोशपूर्ण वक्तृत्वाने सनातन्यांनाही हेलावून टाकले. उपस्थित पालकांवर याचा चांगलाच परिणाम झाला. तक्रार करण्याऱ्यांच्या डोळ्यातही अश्रू उभे राहिले. कोणीही आपली मुले शाळेतून काढून घेतली नाहीत.

# शिक्षण तज्ज्ञ

स्वामीजींचे शिकवणे अतिशय सहज सुंदर असे. ते नुसतेच हाडाचे शिक्षक नव्हते, तर सद्य परिस्थिती आणि भावी काळात शिक्षणाचा दैनंदिन उपयोग कसा होईल, याचे गाढे अभ्यासक होते. ते मुलांना शिकवताना नेहमी वेगवेगळे प्रयोग करुन पाहात. त्यांना हैद्राबाद येथे भरणाऱ्या शिक्षण परिषदेच्या अधिवेशनासाठी खास निमंत्रण मिळाले.

अधिवेशनात स्वामीजींना संस्थानातील शिक्षणाच्या भावी दिशेबद्दल सरकारने नेमलेल्या मॅकेंझी समितीच्या अहवालावर बोलण्यास सांगण्यात आले होते. त्यांचे राजकीय व सामाजिक ज्ञान तर चांगलेच होते. त्यांनी आपल्या भाषणाची तयारीही चांगली केली होती. स्वामीजींना उर्दूचा गंधही नव्हता. त्यामुळे ते इंग्रजीतच बोलले. अधिवेशनाला काही मुस्लिम अधिकारी हजर होते. स्वामीजींच्या अभ्यासपूर्ण भाषणाचा श्रोत्यांवर चांगला परिणाम झाला आणि त्यांची हैद्राबाद शहरात एक 'शिक्षण तज्ज्ञ' म्हणून ओळख झाली.

लोकमानस समजून घेण्यासाठी स्वामीजींना या परिषदेचा उपयोग झाला. तशीच एक चांगली गोष्ट म्हणजे यावेळच्या हैद्राबाद मधील मुक्कामाने स्वामीजींची ओळख उस्मानिया विद्यापीठाच्या वसतिगृहातील, हिंदु विद्यार्थ्यांशी झाली. मुलांनी श्रीकृष्णजयंती साठी स्वामीजींना निमंत्रण दिले. विद्यापीठ अधिकाऱ्याकडून भाषणास परवानगी मिळवली. शिक्षण परिषदेतील भाषणाचा प्रभाव त्या अधिकाऱ्यांवर होता. स्वामीजींची व्यवस्था वसतिगृहाच्या अतिथीगृहात केली होती. तिथे बऱ्याच वर्षानंतर घोंगडी ऐवजी गादीवर झोपताना स्वामीजींना अवघडल्यासारखे वाटत होते. पण मुलांशी

गप्पा मारल्याने त्यांची रात्र फार छान गेली. विद्यार्थ्यांनी आपल्या विविध समस्यांवर स्वामीजींशी चर्चा केली. सगळ्या विद्यार्थ्यांच्यावर होणाऱ्या अन्यायाचीही कल्पना स्वामीजींना दिली. शिक्षणाच्या विविध दृष्टिकोनातून यावेळी विचार करण्यात आला. जेव्हा गप्पांचा ओघ सद्य परिस्थितीकडे वळाला, तेव्हा तर वातावरण एकदम बदलले. आपल्या परिस्थितीची कोंडी फोडण्यासाठी स्वामीजींनी काहीतरी करावे, असे विद्यार्थ्यांना वाटत होते. त्या थोर शिक्षण तज्ज्ञाला आपण शिक्षण क्षेत्रातून बाहेर पडून संस्थानात रजकीय विद्यार्थ्यांची चळवळ सुरु करुन तिचे नेतृत्व करावे, असे विद्यार्थ्यांनी सुचविले भारताच्या या उद्याच्या नागरिकांकडून मिळालेल्या संदेशाने स्वामीजी मंत्रमुग्ध झाले.

# राजकारणात प्रवेश

भोवतालची राजकीय परिस्थिती आणि जनतेवर होत असलेले अनन्वित अत्याचार पाहून स्वामीजींच्या मनात सत्याग्रहाचे वारे वाहत होते. त्यासाठी रजकारणात उतरावे, अशी त्यांची खूप अगोदरपासूनची इच्छा होती. त्यातच नव्याने आनंद कृष्ण वाघमारेंसारख्या स्वामीजींच्या बऱ्याच सहकाऱ्यांनी त्यांना शैक्षणिक कार्यक्षेत्राची सीमा ओलांडून प्रत्यक्ष राजकीय चळवळीत, राजकारणात उतरावे असा आग्रह धरला.

संस्थानी वातावरणात प्रत्यक्ष राजकीय चळवळ सर्व प्रकारच्या त्यागाची तयारी ठेऊन करावी लागणार होती. त्यासाठी प्रस्थापित नेमस्तांचे नेतृत्व उपयोगी पडणार होते. स्वामीजींसारख्या सर्वसंगपरित्यागी व्यक्तीच्या नेतृत्वानेच प्रेरणा मिळेल, असे तरुण कार्यकर्त्यांना वाटत होते. लातूरच्या महाराष्ट्र परिषद अधिवेशनात जमलेले सर्वच कार्यकर्तेस्वामीजींना तशी गळ घालू लागले आणि आताच निर्णय घ्या असे म्हणू लागले.

एकीकडे अंतरीची ओढ राजकारणात उतरण्याची आणि दुसरीकडे शाळेविषयी आस्था या कात्रीत सापडलेल्या स्वामीजींना काय करावे, ते कळेना. त्यांनी थोडा विचार करुन कळविले, ''अंबाजोगाईच्या शाळेच्या सर्वच वर्गांना मान्यता मिळाली आहे व शाळा मार्गी लागली आहे. परंतु योगेश्वरी शिक्षण संस्थेच्या कार्यकारी मंडळाची संमती घेऊनच मी निर्णय घेईन.'' शाळेतील अनेक शिक्षक व कार्यकारी मंडळाचे दोन तृतीयांश सभासद लातूरला हजर होते. मंडळाच्या इतर सभासदांना तातडीने लातूरला बोलावण्यात आले. योगेश्वरी कार्यकारी मंडळाची तातडीची सभा अधिवेशनाच्या आवारातच झाली. त्यात शाळेचे काम आम्ही व्यवस्थित

सांभाळू आपण निर्धास्तपणे राजकारणात उतरावे असे कार्यकारी मंडळाने आश्वासन देऊन स्वामीजींना पूर्ण वेळ राजकीय कामासाठी मुक्त केले. शाळेच्या कार्यकारी मंडळाकडून मोकळीक मिळताच स्वामीजींनी आपण राजकीय कामाला वाहून घेत असल्याचे मित्रांना सांगितले. मित्रांमध्ये उत्साहाचे वातावरण पसरले. मित्रांच्या आग्रहानुसार स्वामीजींना महाराष्ट्र परिषदेच्या अस्थायी समितीचे चिटणीसपद स्वीकारले. अधिवेशन संपताच स्वामीजी अंबाजोगाईला परतले. त्यांना औपचारिकरीत्या निरोप देण्यात आला आणि ३ जून १९३८ रोजी त्यांचा राजीनामा मंजूर करण्यात आला. स्वामीजींच्या राजकारणातील पदार्पणाचे सर्वत्र स्वागत झाले.

# हैद्राबाद स्टेट कॉंग्रेस

स्वामीजी राजकारणात उतरल्यापासून त्यांनी विविध कार्यक्रम हाती घेतले. त्यांचा झंझावत चालूच होता. विविध राष्ट्रीय पुढाऱ्यांना भेटून ते स्वातंत्र्याची रणनीती रचत होते. आपल्या सहकाऱ्यांशी चर्चा करुन त्यांना बरोबर घेऊन स्वामीजी लोकजागरणाचे काम करत होते. लोकांतील देशप्रेम वाढवण्यासाठी त्यांना वेगवेगळ्या माध्यमातून उद्युक्त करत होते. संस्थानातील स्वातंत्र्यलढाही, देशपातळीसारखा तीव्र करावा असे त्यांना वाटत होते. त्यांनी या विषयी आपल्या सहकाऱ्यांशी चर्चा केली. त्यांची विचारचक्रे वेगाने फिरु लागली. देश आणि संस्थान यांच्या सद्य परिस्थितीचा त्यांनी साकल्याने विचार केला.

कॉंग्रेस सारखी एखादी संघटना असावी, हा विचार पुढे आला. रामचारी आदी प्रभृतींनी तो उचलून धरला म्हणून 'हैद्राबाद स्टेट कॉंग्रेस' ची रीतसर स्थापना करण्यासाठी ९ सप्टेंबर १९३८ रोजी रामचारींच्या बंगल्यावर सभा बोलवण्यात आली. सर्व तयारी स्वामीजींनी करुन ठेवली होती. कार्यक्रमाचे नियोजन ठरले. कार्यकारी आणि संघटनेची भूमिका निश्चित केली गेली होती. सर्व हालचालींवर हैदरीचे बारीक लक्ष होते. येणाऱ्या वादळाची त्याला चाहूल लागली होती. हैदरींनी हैदराबाद स्टेट कॉंग्रेसवर जन्माआधीच बंदी घातली. स्वामीजी फार व्यथित झाले. स्वामीजींनी आपल्या काही सहकाऱ्यांना आपली भूमिका पटवून देण्यासाठी मुंबई सरकारकडे पाठवले. ''मी स्वत: शहानिशा करीन'', अशी शंकरराव देव यांनी हमी दिली. हैदरीला मुंबईत बोलावून चौकशी केली. त्याने बंदी उठवायचे मान्य केले.

हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसवरील बंदी उठवण्याची जी भूमिका हैदरींनी घेतली होती, ती हैदराबादमध्ये आल्यावर पुन्हा बदलली. त्यामुळे शंकरराव देव हैद्राबादला आलेच नाहीत. बंदी कायमच राहिली. सर्व मंडळी या प्रकाराने खूपच निराश झाली. स्वामीजी डगमगले नाहीत. ते पुन्हा पेटून उठले. त्यांनी सत्याग्रहाचे शस्त्र अवलंबण्याचे ठरविले.




# कारावास - २

ऑक्टोबर १९३८ ला पुतलीबावडीजवळ स्वामीजी, व्यंकटेश बापूजी ऊर्फ कॅप्टन जोशी, राघवेंद्रराव दिवाण, तेलंगणचे राजरेड्डी व कर्नाटकचे अप्पाराव या पाच जणांनी हैद्राबाद स्टेट काँग्रेसचा सत्याग्रह केला. सत्याग्रह करण्यापूर्वी स्वामीजींनी हैद्राबाद शहराचे पोलीस आयुक्त रहमत यारजंग यांना पत्र पाठवून पूर्वसूचना दिली होती. सत्याग्रह पाहण्यासाठी लोक मोठ्या संख्येने हजर झाले. सत्याग्रह करण्यापूर्वी स्वामीजींनी दोन पत्रके प्रसिद्ध केली होती. सत्य, अहिंसा आणि सत्याग्रह या शीर्षकाखाली पहिल्या पत्रकात सत्याग्रहाच्या क्रांतीचे शास्त्रीय स्वरुप त्यांनी थोडक्यात समजावून सांगितले होते.

हैद्राबाद संस्थानातील प्रजेस आपली राजकीय व आर्थिक हलाखी दूर करण्यास, नागरी स्वातंत्र्याचे मूलभूत हक्क मिळवण्यास, माणूस म्हणून जगण्यास सत्याग्रहाचा अवलंब करण्याखेरीज दुसरा इलाज नाही, म्हणून निर्भयपणे पूर्णपणे शांत राहून आपल्या मूलभूत स्वातंत्र्याची गळचेपी करणारे कायदे मोडू, असे आवाहन स्वामीजींनी सर्वांना केले. सत्याग्रह सुरु झाल्यानंतरच्या पत्रकात त्यांनी तरुणांना विशेष आवाहन केले होते. ''जुलुमाचा प्रतिकार हीच खरी देवाची पूजा आहे, सर्व जगात स्वातंत्र्याचा लढा तरुणानीच जिंकला आहे, आमच्याकडून अपूर्ण राहिलेला धागा उचलून पुढे चला. कोणत्याही जातीच्या व्यक्तीचा किंवा वंशाचा द्वेष न करता पुढे जाऊ या.''

सत्याग्रह दडपून टाकण्यासाठी पकडसत्र सुरु झाले. पहिल्या तुकडीतील सत्याग्रहींना एक महिना साधी कैद व २०० रु. दंड व दंड न भरल्यास १५ दिवस शिक्षा देण्यात आली होती. नंतर स्वामीजी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनाही पकडण्यात आले. इतरांना पाच महिने सक्तमजुरी आणि २५ रु. दंड तर स्वामीजींना एक महिना सक्तमजुरी व ५० रु. दंड ठोठावण्यात आला. दंड न भरल्यास ९ महिने साधी कैद भोगायची होती. सत्याग्रहींच्या तुकड्या वाढत गेल्यावर शिक्षाही वाढत होती. स्वामीजींनी तर शिक्षेची सीमा गाठली होती.

# अंधार कोठडी

सेंट्रल जेलमध्य स्वामीजींना आणल्यावर इतर गुन्हेगारांप्रमाणेच जेलचा पोशाख देण्यात आला. पायात बेडी घातली गेली. स्वामीजींवर बऱ्याच दिवसापासून सरकारचा डोळा होता. त्याचे भोग आता भोगावे लागणार होते. शक्य तितके हाल त्यांचे करायचे, असे सरकारने ठरविले होते. एक घोंगडी, एक थाळी, एक लोटा, एक चटई, एक टॉवेल, दोन चड्ड्या व एक हाफ शर्ट त्यांना दिला होता. सक्तमजुरीची शिक्षा असल्याने टकळीवर सूत गुंडाळण्याचे काम त्यांना देण्यात आले. इतर कैद्यांच्या तिप्पट काम स्वामीजींना देण्यात येई.

एके दिवशी एस्.टी. हॉलिन्स हे अँग्लो इंडियन पोलीस महानिरीक्षक स्वामीजींच्या भेटीस आले. ते स्वामीजींना त्यांच्या कार्याविषयी काही अपशब्द बोलले. स्वामीजींनीही त्यांना सडेतोड उत्तर दिले. खूप शाब्दिक चकमक उडाली. त्याचे परिणाम स्वामीजींना भोगावे लागणार होते. लगेचच त्यांना एका अंधार कोठडीत एकट्यालाच ठेवण्यात आले. त्यांच्या सत्याग्रही सहकाऱ्यांना वेगवेगळ्या तुरुंगात ठेवण्यात आले. आता छळाची तीव्रता वाढणार, यात काही शंकाच नव्हती.

ती अंधार कोठडी म्हणजे एक भयंकर भूतबंगलाच होता. आठ फूट लांब व चार फूट रुंद असलेल्या या कोठडीत दोन छोटे उंच झरोके होते. कोठडीच्या गजाच्या दरवाज्यासमोरच एक भिंत होती, त्यामुळे बाहेरचे काहीच दिसू शकत नव्हते. रात्री कोठडीत दिवाही नसे. मलमूत्र विसर्जनासाठी एक कुंडी कोठडीतच ठेवली होती. दिवसातून काही मिनिटे फक्त स्नानासाठी बाहेर नेण्यात येई. त्यावेळी ते कोणाशीही बोलणे सोडाच पण कोणाकडे नुसती नजरही टाकणार नाहीत, याची पूर्ण खबरदारी घेतलेली असायची.

एवढ्या सगळ्या अनन्वित छळाचा हेतू स्वामीजींचे शारीरिक आणि मानसिक खच्चीकरण करणे हाच होता. स्वामीजी जराही डगमगले नाहीत. त्यांच्या प्रकृतीवर थोडा परिणाम झाला, पण मन आणखीनच बळकट झाले. आपल्याला असेही जगता येते, अशा प्रकारचा विश्वास त्यांना आला. स्वामीजी जवळजवळ १११ दिवस त्या अंधार कोठडीत एकांतवासात होते. पण ते जराही आपल्या विचारापासून ढळले नाहीत.




# वंदे मातरम् !

तुरुंगातील हिंदू कैद्यापैकी ज्यांच्या गळात जानवे होते, ते तुरुंगातच येताच काढून घेण्यात येई. काही सत्याग्रहींनी जानवे परत मिळेपर्यंत अन्नत्याग केला. शेवटी अधिकाऱ्यांनी त्यांना नवे जानवे आणून देण्याचे कबूल केले. मात्र हे नवे जानवे घालताना धार्मिक विधी करावा लागतो. ''या विधीचे उपाध्याय तुम्ही व्हा'', अशी उपतुरुंगाधिकाऱ्यांनी स्वामीजींना विनंती केली. तुरुंगातील काही अधिकारी स्वामीजींना 'गुरुमहाराज' म्हणत. ''मी उपाध्यायाचे काम कधी केलेले नाही मात्र मला येत असलेल्या वेदमंत्राच्या उच्चारात मी त्यांना जानवे देईन'', असे स्वामीजींनी सांगितले.

अधिकाऱ्यांनी सत्याग्रहीला स्वामीजींकडे आणावयाचे, सत्याग्रहीने स्नान करावयाचे, स्वामीजींनी गायत्री मंत्र म्हणावयाचा, पाठोपाठ सत्याग्रहीने तसे उच्चारण करावयाचे व मग स्वामीजींनी नवे जानवे त्याला परिधान करावयास द्यावयाचे. सत्याग्रहींना स्वामीजींशी इतर संभाषणास परवानगी नसली तरी काही धूर्त सत्याग्रहींनी त्यातूनही मार्ग काढला. गायत्रीमंत्रात ते असे काही शब्द घुसडायचे की, स्वामीजींना बाहेरच्या महत्त्वाच्या घटनांची माहिती होई. संस्कृत येत नसल्याने तुरुंगाधिकाऱ्यांना जराही संशय येत नसे.

स्वामीजी तुरुंगात असतानाच १४ नोव्हेंबर १९३८ मध्ये महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचे 'वंदे मातरम्' आंदोलन सुरु झाले. तुरुंगातील काही कैद्यांनीही 'वंदे मातरम्' म्हणायला सुरुवात केली. एका भल्या पहाटे जेलच्या एक बराकीपैकी एका कोपऱ्यातल्या बराकीतून सांघिकपणे सुस्वर असे गायिलेले 'वंदे मातरम्' ऐकू येऊ लागले. लगेच प्रत्येक सत्याग्रही 'वंदे मातरम्' म्हणू लागला. तीन दिवसापर्यंत हे चालले. पुढे तुरुंगाधिकाऱ्यांनी 'वंदे मातरम्'

म्हणू दिले जाणार नाही, म्हणून बजावले. स्वामीजींनी या आदेशाचा निषेध केला व आपण हे गीत गाणारच, असे निर्भिडपणे सांगितले. या कृत्याचे परिणाम भयंकर होतील असे त्यांना सांगण्यात आले. ''तुम्ही या कोठडीत एकटेच आहात, तुम्ही एकट्याने हे गीत म्हणण्यास हरकत नाही. पण सांधिकरित्या ते म्हणू दिले जाणार नाही.'' असे सांगून तो निघून गेला.

एके दिवशी हा हुकुम मोडणाऱ्या सत्याग्रहींना धडा शिकवण्यचे अधिकाऱ्याने ठरविले. दुपारीच सत्याग्रहींना इतर कैद्यांच्या बराकीत बंद केले. एकाने बंदी हुकुम मोडून 'वंदे मातरम्' चा सुमधुर स्वर सुरु करताच त्याला तुरुंगाधिकाऱ्याच्या आदेशभंगाबद्दल फटक्यांची शिक्षा फर्मावण्यात आली. लगेच त्याला फटक्यासाठीच्या खांबाला बांधण्यात आले. फटके मारण्यास सुरुवात झाली. प्रत्येक फटक्याबरोबर तो 'वंदे मातरम्' ची घोषणा देई. प्रत्येक घोषणेबरोबर फटक्याची तीव्रता वाढतच होती. पण सत्याग्रही काही हार मानायला तयार नव्हता. त्यामुळे तुरुंगाधिकारी फारच चिडला होता. सत्याग्रहीच्या अंगावर फटक्यांचे वण उठत होते. त्यातून रक्त येवू लागले होते. ती वेळ तुरुंगाधिकाऱ्याची निष्ठुरता आणि त्या सत्याग्रहीची सहनशीलता व देशप्रेम याची परीक्षा पहात होती. म्हणून तर दोघांपैकी कोणीही थांबायला तयार नव्हते. छड्यांचा आवाज व त्या सत्याग्रहीच्या घोषणा स्वामीजींच्या कोठडीपर्यंत ऐकू येत होत्या. बेशुद्ध पडेपर्यंत 'वंदे मातरम्' च्या घोषणा करणाऱ्या 'रामचंद्र' नावाच्या सत्याग्रहीला नंतर 'वंदे मातरम् रामचंद्रराव' या नावाने ओळखले जाऊ लागले.




# पहिला वैयक्तिक सत्याग्रही

शिक्षेचा कालावधी पूर्ण केल्यावर स्वामीजींची सुटका झाली. कारावासामुळे त्यांची प्रकृती खूपच खालावली होती. देशभरात सत्याग्रहाचे वारे वाहत होते. गांधीजींनी अहिंसेच्या मार्गाने वैयक्तिक सत्याग्रहाचा आग्रह धरावा असे सुचविले होते. संस्थानातील सत्याग्रहासची दिशा ठरविण्यासाठी आणि पुढचे पाऊल उचलण्यासाठी गांधीजींना भेटावे, असे स्वामीजींना वाटत होते स्वामीजी वर्ध्याला गेले.

स्वामीजींनी गांधीजींशी चर्चा केली. गांधीजींनी एक प्रश्न केला, ''अहिंसा हे तुमचे धोरण आहे की निष्ठा?'' हा प्रश्न स्वामीजींच्या अंत:करणात बाणासारखा रुतला. या प्रश्नाच्या उत्तरानंतरच पुढचे पाऊल ठरणार होते. ''विधायक कार्यक्रमाचा उपयोग केवळ कातडी बचावण्यासाठी, केवळ स्वत:ची सुटका करुन घेण्यासाठीच आहे का?'' असा प्रश्न स्वामीजींना पडला. ते पार गोंधळून गेले होते. एका कोपऱ्यात जाऊन बसले. महात्माजींनी लावलेल्या कसोटीला ते उतरतात की नाही, याचा विचार रात्रभर करत राहिले. ते रात्रभर अस्वस्थ होते. अगदी पहाटेच त्यांचा निर्णय झाला.

दुपारी स्वामीजी गांधीजीच्या झोपडीत गेले आणि त्यांना म्हणाले, ''मी जरी पूर्ण अहिंसावादी नसलो तरी तत्त्वानुसार जन्मभर वागण्याचा मी प्रयत्न करेन,'' गांधीजींनी त्यांच्या नजरेला नजर भिडवून स्मित केले. स्वामीजींना हैद्राबाद स्टेट काँग्रेसवरील बंदी हुकुम मोडून वैयक्तिक सत्याग्रह करण्याची परवानगी दिली. स्वामीजींच्या आयुष्यातील तो सर्वात मोलाचा क्षण होता. त्यांनी अगदी आदरपूर्वक महात्माजींच्या चरणांना स्पर्श केला. गांधीजींनी स्वामीजींच्या पाठीवर थाप मारुन आणखी आठवडाभर सेवाग्रामला थांबण्यास सांगितले.

सेवाग्राममधील पुढचे आठ दिवस स्वामीजींसाठी अपूर्व होते. त्यांची गांधीजींशी विविध विषयावर खूप चर्चा झाली. सत्याग्रहाविषयी स्वामीजींचे विचार या काळात आखणीनच दृढ झाले. गांधीजींनी पहिला वैयक्तिक सत्याग्रही म्हणून स्वामीजींची निवड केली. स्वामीजींनी गांधीजींचा आशीर्वाद घेतला आणि वर्धा सोडले.

# कारावास - ३

गांधीजींच्या सहावासामुळे आपल्या ठिकाणची अर्धवट, अस्थिर, चंचल असलेली श्रद्धा दसपट दृढ झाली, असे स्वामीजींना वाटत होते. आपण काँग्रेसचे सत्याग्रही म्हणून काम करणार असल्याचे पत्र त्यांनी निजाम सरकारला कळवून सत्याग्रहाची सुरुवात केली होती.

हैद्राबादला येण्यापूर्वी स्वामीजींनी हैद्राबाद स्टेट काँग्रेसवरील संस्थानची बंदी उठवण्यासाठी काशिनाथराव वैद्य व सरकार यांच्यात झालेल्या पत्रव्यवहाराची पुस्तके छापून घेतली. ती संस्थानात पाठवली होती. संपूर्ण अहिंसात्मक मार्गाने सत्याग्रह चालवण्याचे ठरले होते. सरकारच्या आश्रयाखाली जबाबदार राज्यपद्धतीसाठी या लढ्यात, बुद्धीभेदाला अजिबात थारा न देण्याच आणि जाती व धर्म इत्यादींचा विचार न करता सर्वांसाठीच हा लढा आहे, हे स्वामीजींना सर्वांना दाखवून द्यायचे होते.

स्वामीजींनी सरकारला पाठविलेल्या पत्राचे लवकर उत्तर मिळाले. स्वामीजींनी सत्याग्रहाचा विचारही पक्का करुन टाकला. सप्टेंबर १९४० रोजी बरीच रात्र झाल्यावर सुलतानबाजारातल्या क्लॉक टॉवर समोरच्या घरात गाढ झोपेत असलेल्या स्वामीजींना उठवून त्यांना अटक करण्यात आली. सुलतानबाजाराला पोलिसांनी वेढा घातला होता. स्वामीजींना त्यांच्या व्यक्तिगत गरजांचे समानही न घेऊ देता त्यांना घरासमोर उभ्या केलेल्या वाहनात बसवण्यात आले. सोबत नेहमी जवळ असणारी गीता फक्त त्यांना घेता आली.

एवढ्या अंधाऱ्या रात्री आपल्याला कोठे नेण्यात येत आहे, याची कल्पना नसली तरी तो तुरुंगच असणार, हे त्यांना माहित होते. पहाट होण्यापूर्वीच त्यांना निजामाबादच्या तुरुंगातील एका खोलीत दाखल करण्यात आले. त्यांची अटक सार्वजनिक सुरक्षा नियमाखाली आहे हे त्यांना काही दिवसांनी सांगण्यात आले.




स्वामीजींना अटक झाल्यानंतर कोठे ठेवले आहे, हे बरेच दिवस लोकांना कळूच शकले नाही. तुरुंगातून लवकर सुटका होणार नाही, बहुधा २-३ वर्षही लागतील, याची कल्पना स्वामीजींना होती. बाहेरच्या जगाशी पुरता संबंध तुटला होता. म्हणून ज्यापासून प्रेरणा मिळाली असा, निसर्ग आणि चिंतनासाठी भरपूर वेळ,या देन्हीचा भरपूर आस्वाद स्वामीजींनी घेतला. प्रार्थना व ध्यान नियमित सुरु झाले. स्वत:ची कामे स्वत:च करत. टळकीवर सूत कातत. गीता, उपनिषद यांचे वाचन करत. याशिवाय उर्दू शिकण्यास प्रारंभ केला. वर्षभरात उर्दू शिकले. उलेला वेळ आध्यात्मिक साधनेत जाई. दीर्घकाळचा एकांतवास हा स्वामीजींच्या मनाला अंतर्मुख करणारा, चिंतनशील बनवणारा ठरला. हिप्परगा सोडल्यापासून बंद झालेले रोजनिशी लेखन पुन्हा सुरु झाले. ते अनुभवलेल्या मानसिक आंदोलनाची नोंद ठेवत. आत्मनंदाविषयी त्यांनी लिहून ठेवले, ''अंबाजोगाईला नृसिंहतीर्थावर वास करीत असताना मुकुंदराजांच्या समाधी दर्शनास जात असे. भोवतालची रम्य वनराई व गूढ शांतता अंत:करणाला प्रफुल्लित करीत असे. या जन्मी देशसेवा आपल्या वाट्यास आलेली आहे. गिरिकंदरात आत्मानंदात निमग्न राहण्याचा योग नाही. सदैव समाधीत रहाण्यासाठी का होईना, आणखी एक जन्म घ्यावा लागेल. असे, वारंवार वाटे. आता ही भावना खुळी वाटते. इच्छा काहीच नाही. सर्वत्र तेच आहे, इच्छा, संकल्प, ओढ सारी गेली. तत्त्व कळले, उमगले, एकरुपतेच्याच मार्गावर आहे. सदैव समाधीच आहे.''

१९४१ सालची संक्रांत तुरुंगात उजाडायची होती. आपल्या आजवरच्या साधनेचा परामर्श त्यांचे मन घेवू लागले. त्या रात्री त्यांनी लिहून




ठेवले होते, ''संन्यासदीक्षा घेऊन आज पुरी ११ वर्षेझाली. आजचा दिवस आत्मनिरीक्षणाच आहे. एकंदर आयुष्याचा आढावा घेता मला पुढील गोष्टी उमगून आल्या...

मी पूर्णपणे ईश्वरार्पण झालो आहे. ही त्याचीच कृपा आहे. मी निर्वैर आहे. अंत:करणातून वैराचा सर्वस्वी लोप झाला आहे. अनासक्त कार्यरत रहाण्याची सवय निसर्गभूत झाली आहे. आसक्ती जवळजवळ नष्ट होत चालली आहे. याबाबतीत थोडीशी अपूर्णता आहे. इंद्रियनिग्रह या बाबतीत मन क्वचित प्रसंगी दगा देते. रसनेंद्रियावर जास्त ताबा आला आहे. मनाचे स्थैर्य चांगले आहे. पूर्ण अपरिग्रह आहे. सुखदु:खाचे हेलकावे फारच कमी बसतात. मृत्यूचे भय यत्किंचितही वाटत नाही, सर्वांभूती परमात्मभाव अनुभवास येतो.''




# कारावास - ४

स्वामीजींच्या कल्पनेप्रमाणे त्यांना कारावासात रहावे लागले. त्यांची सुटका झाली, तेव्हा रंगून शहर दोस्त राष्ट्रांच्या हातून जपानच्या ताब्यात गेले. युद्ध भारताच्या दाराशी आले होते. ''भारताच्या भवितव्यासंबंधी तेव्हा नवी योजना तयार केली असून सर स्ट्रॅफर्ड क्रिप्स हे मंत्री त्यावरील चर्चेसाठी भारतात येणार आहेत'', असे ब्रिटिश मंत्रीमंडळाने जाहीर केले. गांधीजींच्या नेतृत्वाखाली स्वामीजींसह सर्व नेत्यांनी क्रिप्सच्या योजनांना विरोध करावयाचे ठरवले होते.

चर्चा करण्यासाठी स्वामीजी सेवाग्रामला आले. दहा दिवसांच्या मुक्कामात स्वामीजींच्या गांधीजींशी अनेक चर्चा झाल्या. ''स्वामीजींनी परत हैद्राबादेस जावे आणि मुंबईस भरणाऱ्या अखिल भारतीय काँग्रेस महासमितीच्या अधिवेशनास सहकाऱ्यांसह उपस्थित रहावे'', असे गांधीजींनी सांगितले.

अधिवेशनात गांधीजी, पंडित नेहरु, आदि मान्यवरांची भाषणे झाली. ब्रिटिश भारतातील जनता व संस्थानी जनतेने एकत्रितपणे आंदोलनात भाग घेण्याचे ठरवले. पण आ.कृ. वाघमारे, गोविंदराव श्रॉफ यासारखे खंदे सहकारी तुरुंगात असल्याने याची सारी जबाबदारी स्वामीजींवर पडणार होती.

अधिवेशन संपले. दुसऱ्या दिवशी सकाळीच काँग्रेस नेत्यांना अटक झाली. संस्थानिकांना स्थानिक संघटनेमार्फत पाठवण्याचा मसुदा तयार करुन ते पत्र संस्थानापर्यंत पोहचवायचे होते. रात्रीच स्वामीजीं सोलापुरात आले. नानलांची प्रकृती बिघडल्यामुळे पत्र पाठवण्याचे काम स्वामीजींकडे आले. पत्र पोहोचताच स्वामीजींना अटक होणार होती. गोवालिया टँकवरुन गांधीजींनी

'राष्ट्राला दिलेला संदेश' शिरोभागी छापून एक पत्र जनतेसाठी तयार केले. त्यात सर्वांना सत्याग्रहाची हाक देण्यात आली होती. बंदी हुकुम मोडण्यास सांगितले होते. पत्र सर्वांना मिळेल याची व्यवस्था केली. स्वामीजींनी आपल्याबरोबर तीन जणांना प्रत्येकाजवळ संस्थानिकाला द्यावयाची पत्राची प्रत घेऊन वेगवेगळ्या मार्गांनी पाठवलले. त्यांना हे पत्र हैद्राबादला पोहचवायचे होते. गुलबर्गा स्थानकावर मोठ्या संख्येने पोलिस हजर होते, पण तेथे त्यांना अटक झाली नाही. वाडीला गाडी बदलतानाही त्यांना अटक झाली नाही. संध्याकाळी हैद्राबादच्या नामपल्ली स्थानकावर स्वामीजी उतरले. स्थानकाबाहेर येवून टांगा ठरवत असताना एका पोलिस आयुक्ताने त्यांना अटक केली. स्वामीजींच्या सहकाऱ्यांनी त्यांना पकडून नेताना पाहिले तेव्हा तेथून ते सटकले. स्वामीजींचे निष्ठावंत सहकारी डॉ. मेलकोटे त्यांचेकडे ते पत्र सहकाऱ्यांनी पोहचवले. डॉ. मेलकोटे यांनी त्या पत्राला आपलीही पुस्ती देऊन सही करुन संस्थानिकांकडे पाठविले. स्वामीजींना चंचलगुडा कारागृहात ठेवण्यात आले. नेहमीचाच अशांतता माजवण्याचा आरोप ठेवला होता. सोळा महिन्यांनी, डिसेंबर १९४३ साली स्वामीजींची त्या कारागृहातून सुटका झाली.




# ..... आणि बंदी उठली.

स्वामीजींच्या नेतृत्वाखाली कार्यकर्त्यांचा संच वाढत होता. तेलंगण, कर्नाटक व मराठवाडा या तिन्ही विभागात स्थानिक परिषदा कार्यरत होत्या. त्यांचे नेते होते, 'स्वामीजी'! त्यांना स्वामीजींनी बी. रामकृष्णराव यांच्या अध्यक्षतेखाली 'जॉईंट को-ऑर्डीनेशन' कमिटीअंतर्गत एकत्र आणले. त्यातही दोन गट पडले. मवाळात सरंजामदार, जहागीरदार, जमीनदार, वतनदार व त्यांच्या हितसंबंधना जपणाऱ्या स्वार्थी लोकांचा भरणा होता. त्यांच्या मनात शासनाबाबत आस्था, तर स्वामीजींबाबत उपेक्षा होती.

स्वामीजी लोकशाही समाजवादाचे पुरस्कर्तेहोते. जमीन धारणेची मर्यादा कमी करुन तिचा अधिकार कुळांना, प्रत्यक्ष जमीन कसणाऱ्यांना मिळावा, असा त्यांचा आग्रह होता. गांधीजींच्या सल्ल्यानुसार स्वामीजींनी खेडोपाडी फिरुन स्टेट काँग्रेस तिथपर्यंत पोहोचविली. स्वामीजी मराठी, कानडी, तेलगु, इंग्रजी, उर्दू व हिंदी इतक्या भाषा सफाईदारपणे बोलत, त्यामुळे लोकांवर त्यांचा त्वरीत प्रभाव पडे.

हळूहळू संस्थानात जबाबदार राज्यपद्धती आणि नागरी स्वातंत्र्याची मागणी, यांनी जोर धरला. राजकीय बंडखोरी खूपच वाढू लागली. स्वातंत्र्याच्या मागणीसाठी संपूर्ण देश पेटून उठला होता. लोकांच्या भावनांना आवर घालणे कठीण होऊन बसले. संस्थानी सरकारला त्याची धग लागत होती. ते परिस्थितीचे परिणाम ओळखू लागले होते. अखेर स्वामीजींच्या प्रयत्नांना यश  आले. ३ जुले १९४६ रोजी सरकारने स्टेट काँग्रेसवरील बंदी उठवली. स्वामीजींच्या अध्यक्षतेखाली लोकांच्या हक्क संरक्षणासाठी संघटना उभारण्यात आली. लोकांमध्ये चैतन्य पसरले होते. वरच्या पातळीवरही हैद्राबादचा प्रश्न चर्चिला जावू लागल्याने स्वामीजींचा त्या नेत्यांशी संपर्क वाढला. हळूहळू नेतेमंडळी स्वामीजींना पूर्ण पाठिंबा देऊ लागली.

# लढ्याचे नेतृत्व.

कामकाजात एकजिनसीपणा रहावा, निर्णयांची अंमलबजावणी सोयीची व्हावी म्हणून तिन्ही प्रांतिक परिषदा स्टेट कॉंग्रेसमध्ये सामील करण्यात आल्या व त्याचे अध्यक्ष होते, साहजिकच स्वामीजी!

सरकारने बंदी उठविल्यानंतर १६,१७ व १८ जून १९४७ ला हैद्राबादला स्टेट कॉंग्रेसचे पहिले अधिवेशन भरले. संस्थानाबाहेरची नेते मंडळी मार्गदर्शनासाठी येणार होती. त्यांच्यावर सरकारने बंदी घालण्याचे ठरविले. स्वामीजींनी त्यांना खडसावले, ''पाहुण्यांना मुद्दाम प्रतिनिधींना मार्गदर्शन करण्यासाठीच बोलावले आले. आम्ही जे करीत आहोत ते विचारपूर्वकच आहे. आम्ही त्यात बदल करणार नाही. सरकारला जे योग्य वाटते ते करायला ते मोकळे आहेत.''

स्टेट कॉंग्रेसचे पहिले अधिवेशन तणावपूर्ण वातावरणात पार पडले. काही नेत्यांना अटक झाली, हे अधिवेशन हा स्वामीजींच्या नेतृत्वाचा परमोच्च बिंदू होता. स्टेट कॉंग्रेसवरील बंदी दूर होणे व देशाच्या स्वातंत्र्याच्या आगमनाची निश्चिती होणे, या दोन्हीमुळे लोक निर्भय झालेले दिसत होते. अधिवेशन स्थळी जमलेल्या हजारो लोकांच्या चेहऱ्यावर लढ्याचा निर्धार स्पष्ट दिसत होता आणि या लढ्याचे निर्विवाद नेते म्हणून त्यांनी 'स्वामी रामानंद तीर्थांना' स्वीकारले होते.




# कारावास - ५.

महात्मा गांधीजींच्या नेतृत्वाखाली देशभर स्वातंत्र्य लढ्याने उग्ररूप धारण केले होते. संस्थानिकाची मात्र स्वतंत्र अस्तित्व टिकवण्याची केविलवाणी धडपड चालूच होती. त्यांनी पुन्हा संधिसाधू व स्वार्थी लोकांना जवळ करुन काही सुधारणा, सवलती देण्यासाठी अय्यंगार समिती नेमली होती. त्यांचा तो बहाणा व वेळकाढूपणाच्या धोरणाचा डाव स्वामीजींनी ओळखला. त्या सुधारणावर बहिष्कार टाकला. सरकारने निवडणुकीची खेळी करुन पाहिली, पण पुनरावृत्तीच झाली. बहिष्कारामुळे मतपेट्या रिकाम्या परत गेल्या.

स्वामीजींनी सरकारला इशारा दिला, ''अगोदर हैद्राबाद संस्थान भारतीय संघराज्यात विलीन करा. लोकशाही मान्य करा व हैद्राबाद संस्थानचे वेगळे अस्तित्व संपवा.'' स्वामीजींनी दिल्लीला जावून गांधीजी व जेष्ठ नेत्यांची भेट घेतली. त्यांनी सल्ला दिला, ''७ ऑगस्ट १९४७ हा दिवस संस्थान भारतीय संघराज्यात सामील करण्याचा दिवस म्हणून पाळा. घरोघरी स्वातंत्र्याचा तिरंगा फडकवा, शाळा कॉलेजवर बहिष्कार टाका, कोर्ट कचऱ्या ओस पाडा, सरकारचे कायदे मोडा, पण शांतता सोडू नका.''

हैद्रबादला येवून या संदेशाचे स्वामीजींनी संस्थानभर आवाहन केले. चांगला प्रतिसाद मिळाला. ७ ऑगस्ट १९४७ ला स्वामीजी स्वतःच्या खांद्यावर तिरंगा घेवून निघाले. शहरातून मिरवणूक काढली, ती इतकी प्रचंड होती की, सरकारला काय करावे तेच कळेना. पण सरकारचे रक्त खवळले होते. त्यांनी स्वामीजींना अटक केली. पण जमावाचा रोष आणि एकूण वातावरण पाहून लगेच सोडून दिले.

# स्वातंत्र्याची पहाट.

१५ ऑगस्ट १९४७ रोजी भारत स्वतंत्र झाला. तिरंग्या ध्वजाला देशभर वंदन करण्याचा कार्यक्रम ठरविण्यात आला. स्वामीजी हैद्राबाद शहराच्या सुलतानबझार भागात रहात होते. ते घरातून बाहेर आले. हजारो लोकांबरोबर भारतीय स्वातंत्र्याच्या गगनभेदी उन्मादात दिल्लीहून आणलेला तिरंगा ध्वज त्यांनी उभारला. स्वामीजींनी ध्वजाला वंदन केले. त्यांनी सर्वांसमक्ष मोजक्याच शब्दात स्वतःच्या मनातील भावनांना वाट करुन दिली, ''या ध्वजाची शान राखताना आलेले मरण अतिशय पवित्र असेल, मंगल असेल. पानसरे, भगतसिंग, राजगुरु, सुखदेव, चंद्रशेखर आझाद इत्यादी क्रांतीकाक हुतात्म्यांनी हा मार्ग पुनित करुन ठेवला आहे. आपणही त्याचे अनुकरण करीत त्याच मार्गाचा अवलंब करु.....''

सर्वत्र तिरंगा फडकला. परिणामाची कल्पना स्वामीजींना होतीच. आपल्याला अटक होणार, हे ते जाणून होते. आपल्या गैरहजरीत संघटना व तिचे कार्य नीट चालावे. यासाठी त्यांनी अगोदरच काही तरतुदी करुन ठेवल्या होत्या. काही विश्वासू सहकाऱ्यांकडे त्यांनी प्रत्येक विभागाची सूत्रे दिली होती. त्याचप्रमाणे त्यांनी काही कृतिसमित्याही नेमल्या होत्या. विजयवाडा (तेलंगणा), गदग (कर्नाटक), मनमाड (मराठवाडा) या तिन्ही विभागात आंदोलन कार्यालये उघडली. प्रत्येकाला कामे दिली.

स्टेट कॉंग्रेसची केंद्रीय कार्यालय असण्याची गरज भासू लागली. त्यासाठी मद्रास आणि मुंबईची निवड केली. या कामात विविध नेत्यांनी स्वामीजींना मदत केली. सरकारची सर्व गोष्टींवर कटाक्षाने नजर होती. हैद्राबाद संस्थान स्वतंत्र भारतातून वेगळे राहू शकत नाही. हे सगळेजण जाणत होते. म्हणून सरकारने बावीस कोटी रुपयांची शस्त्रे घेऊन सैनिकी बळ व

समर्थक वाढवले तसेच समर्थक संघटनांना गावोगावी जावून लोकावर अत्याचार करण्यास सांगितले. सर्वत्र मनमानीकारभार सुरु झाला.

गांधीजींनी या सर्वाचा अहिंसात्मक मार्गाने प्रतिकार करण्याचा सल्ला दिला. त्यानुसार स्वामीजींनी स्वातंत्र्यलढा आणखी तीव्र केला. स्वामीजी स्वतंत्र भारताच्या सरकारशी संपर्क ठेवतच होते. येथील सरकारचा मनमानी कारभार, अत्याचार स्वामीजी केंद्र सरकारला कळवत होते. त्यावर ठोस पावले उचलण्यास ते सुचवित होते. त्याचबरोबर स्वत:ही सत्याग्रह करतच होते. सत्याग्रह आणि सत्याग्रहींची संख्या मालिके ने वाढतच होती. शेवटी संस्थानी सरकारने स्वामीजींना अटक केली.

जनता आणखी प्रक्षुब्ध झाली. रयतेवरील जुलमांना मर्यादा राहिली नाही. केंद्र सरकारला हस्तक्षेप करण्याशिवाय गत्यंतर राहिले नाही. पोलिस कारवाई करण्यात आली. संस्थानांमध्ये तीन मार्गांनी भारतीय लष्कराने जुलमी संघटकाच्या आणि निजामी सैनिकांना अवघ्या चार दिवसात शरण येण्यास भाग पाडले. संस्थानी सरकार शरण आले. भारतीय स्वातंत्र्यानंतर सुमारे १३ महिन्यांनी हैद्राबाद संस्थान भारतीय संघराज्यात विलीन झाले. संस्थानी सरकारने शरणागती पत्करल्याने स्वामीजींची सुटका झाली. त्याचबरोबर संस्थानातील जनताही स्वतंत्र झाली होती. १७ सप्टेंबर १९४८ हा यशस्वी पोलिस कारवाईचा शेवटचा दिवस होता. याच दिवशी ‘हैद्राबाद मुक्ती संग्राम लढा’ यशस्वी झाला. स्वामीजींचा सर्वात मोठा विजय झाला होता. एका संन्याशाच्या तेजापुढे संस्थानिकाला नतमस्तक व्हावे लागले. हा दिवस हैद्राबाद मुक्ती दिन म्हणून संस्थान भर साजरा झाला.

# पुनश्च 'हरि ॐ'!

स्वामीजी तुरुंगातून बाहेर आले. हैद्राबाद संस्थान भारतीय संघराज्यात सामील झाले. आता नवीनच प्रश्नांनी डोके वर काढले. सार्वत्रिक शांतता, जातीय दंगे थोपवणे, चळवळ चालू असताना प्रतिकारासाठी मिळवलेली शस्त्रास्त्रे लष्करी प्रशासनाला परत करणे, इत्यादी आव्हाने स्वामीजींपुढे आ वासून उभी होती.

हैद्रबादचे स्वतंत्र अस्तित्व संपवून त्यांच्या त्रिभाषिक प्रदेशाचे शेजारच्या त्या त्या भाषा बोलणाऱ्या विभागात विलिनीकरण करणे, हेच स्वामीजींचे अंतिम ध्येय होते. आपसातली काही माणसे त्यांच्याविरुद्ध उठली होती. कर्तव्यशून्य लोकांचाच विरोधकात समावेश होता. त्यातील बऱ्याच जणांनी कृति समितीचे आदेश पाळले नव्हते, आंदोलनात भागही घेतला नव्हता. मद्रासच्या बैठकीत त्यांच्याविरुद्ध शिस्तभंगाची कारवाई करण्यात आली.

असंतुष्टांनी समांतर काँग्रेस निर्माण केली. स्वामीजी व त्यांच्या सहकाऱ्यांविरुद्ध त्यांनी टीकेची झोड उठवली. २४ ऑक्टोबर १९४८ ला कृतिसमिती विसर्जित झाली. विरोधकांना पुन्हा संघटनेत सामावून घेण्यात आले. विरोधकांना तोंड देत स्वामीजी आपल्या ध्येय-धोरणांना सांभाळीत होते.

१२ जून १९५० ला पहिले मंत्रीमंडळ नेमण्यात आले. त्यात स्वामीजींची फक्त दोन माणसे घेण्यात आली. लोकसभेवरही हैद्राबाद येथून सोळा सदस्य नेमण्यात आले, त्यातही स्वामीजीची चारच माणसे घेण्यात आल.स्वामीजी मुळातच विरक्त आणि संन्याशी होते. त्यांना आपसातले

भांडणतंटे नको होते. दुसऱ्यांना आपली अडचण नको, त्यांच्या मार्गात अडथळा नको, म्हणून स्वामीजींनी स्टेट काँग्रेसच्या अध्यक्ष-पदाचा राजीनामा दिला.

स्वामीजींनी सर्व कारभार नव्या अध्यक्षांवर सोपवला. त्यांच्या अनुयायांना हा बदल मान्य झाला नाही. ते स्टेट काँग्रेसमधून बाहेर पडले. स्वामीजींना यामुळे खूप यातना झाल्या. ते पुन्हा शिक्षण क्षेत्राकडे वळले. नांदेडला येवून त्यांनी 'नांदेड एज्युकेशन सोसायटी' ची स्थापना केली. २६ जून १९५० ला नांदेडच्या 'पीपल्स कॉलेज' चे उद्‌घाटन झाले. स्वामीजी हळूहळू राजकारणातून मुक्त होऊ लागले. लोकजागृती व कल्याणाकडे त्यांचा कल वाढला. यासंबंधीच्या विचारांचा प्रचार व्हावा, म्हणून त्यांनी 'व्हिजन' नावाचे इंग्रजी साप्ताहिक सुरु केले. स्टेट काँग्रेसची पडझड वाढतच होती. मराठवाडा विभागातील बहुतेक कार्यकर्त्यांनी काँग्रेस सोडली. स्वामीजी बेचैन झाले. त्यांना राहवले नाही. स्वामीजींनी राज्यभर दौरे केले, सभा घेतल्या. सर्वांना धीर दिला. त्यांच्या मनातून परस्परांबाबतचा अविश्वास आणि भीती दूर सारण्याचा प्रयत्न केला. बाहेर राहूनही काँग्रेसला खऱ्या अर्थाने धर्मनिरपेक्ष ठेवण्यासाठी ते अतोनात झटू लागले.

# झुंजार खासदार

१९५२ साली देशात पहिली सार्वत्रिक निवडणूक झाली. गुलबर्गा मतदारसंघातून स्वामीजी लोकसभेसाठी उभे राहिले. भरपूर मताधिक्याने ते विजयी झाले. भाषावार विभाजनाची स्वामीजींची भूमिका ठाम होती. स्वामीजींनी ती भूमिका अजूनच लावून धरली. काही नेत्यांनी हैद्राबाद राज्याच्या विभाजनास तीव्र विरोध दर्शविला. या परस्परविरोधी मतप्रवाहामुळे स्वामीजींशी त्याचे मतभेद सुरु झाले.

'संयुक्त महाराष्ट्र परिषद' स्थापना झाली. उपाध्यक्षपदी स्वामीजींची नियुक्ती झाली. त्यांनी खुलेआम भाषिक पुनर्रचनेवर भर दिला. त्या दृष्टीने आपली मते प्रगट केली. १९५३ साली हैद्रबादला अखिल भारतीय काँग्रेसचे अधिवेशन भरले. स्वागताध्यक्ष म्हणून स्वामीजींवर जबाबदारी पडली. आपल्या भाषणात स्वामीजींनी हैद्राबाद राज्याच्या भाषावार प्रांतरचनेवर जोर दिला. त्यांच्या विरोधकांनी त्यास विरोध केला. पण त्यांचा स्वामीजींवर ठाम विश्वास होता.

स्वामीजींच्या या ठाम भूमिकेमुळे आणि त्यांनी सर्वांना भाषावार प्रांतरचनेचे महत्व पटवून दिल्यामुळे १९५६ मध्ये हैद्राबाद संस्थानचे तीन भाषिक तुकडे करण्यात आले. मराठवाड्याचे मराठी भाषिक पाच जिल्हे महाराष्ट्र राज्यात; कर्नाटकातील कन्नड भाषिक तीन जिल्हे कर्नाटक राज्यात; तेलंगणाचे तेलगू भाषिक आठ जिल्हे आंध्र राज्यात विलीन करण्यात आले. हैद्राबाद संस्थानचे अस्तित्व पूर्णपणे नष्ट झाले. स्वामीजींचा लोककल्याणाच्या दृष्टीने आणखी एक विजय झाला. त्यांच्या या आग्रहाची व दूर दृष्टीची नंतर वाहवाच झाली.

तेलंगात लष्कर व जनता यांच्यात चकमकी उडू लागल्या. स्वामीजी तिकडे पोहचले. चिल्लेपल्ली येथे गावाबाहेर एक झोपडी बांधून, ते तेथे राहू लागले. एका लष्करी अधिकाऱ्याने त्यांना विचारले, ''स्वामीजी, आपल्याला संरक्षण हवे आहे का? आपली इच्छा असल्यास आम्ही ते देऊ.'' स्वामीजींनी त्यांना नम्रपणे म्हटले, ''आपण सहानुभुती दाखविली मी आपला फार आभारी आहे. मला कोणाकडूनही संरक्षण वगैरे नको आहे. मला माझ्याच पद्धतीने राहू द्या.'' चिल्लेपल्लीला आपले वास्तव्य ठेवून स्वामीजी दिवसभर खेड्यापाड्यात फिरत. लोकांत सामील होत. त्यांना धीर देत, त्यांच्या समस्या व म्हणणे ऐकून घेत. त्यावर विचार करत.

स्वामीजींनी विषम जमीनधारणेविरुद्ध आवाज उठवला. त्यांनी हा प्रश्न लोकसभेतही हिरिरीने मांडला. त्यामुळे कमाल जमीन धारणेवर मर्यादा आली. भारतात प्रथम कुटळवहिवाट कायदा पास झाला. हे सर्व स्वामीजींच्या प्रयत्नांचे फलित होते.

# विधायक कार्ये

१९५७ ला भारतातील दुसरी सार्वत्रिक निवडणूक झाली. स्वामीजी यावेळी औरंगाबाद लोकसभा मतदार संघातून निवडणुकीला उभे राहिले आणि प्रचंड मताधिक्याने निवडूनही आले. थोड्याच दिवसांनी महाराष्ट्रात मुंबईसह 'संयुक्त महाराष्ट्र चळवळ' सुरू झाली. १९५६ मध्येच हैद्रबादचे तीन भाषिक तुकडे करण्यात आले होते, महाराष्ट्राचा वाद हाताळण्यासाठी शासनाने एक कमिशन नेमले. ते हैद्राबादला आले. स्वत: स्वामीजी व सहाकऱ्यांनी मराठवाड्याची भूमिका स्पष्टपणे कमिशनसमोर मांडली. कमिशनच्य शिफारशीनुसार राज्य पूनर्रचना झाली.

एका नव्याच प्रश्नाने डोके वर काढले. 'मुंबईसह गुजरात असे महाराष्ट्राचे द्विभाषिक राज्य अमलात आणणे.' त्यावेळच्या सर्व खासदारांना ती कल्पना आवडली. स्वामीजींनी आपले मत मांडले, ''ही कल्पना मला मान्य नाही. याला माझा सक्त विरोध आहे. कोणी असे करणार असेलच तर माझी त्याला संमती असणार नाही.'' पूर्वानुभवामुळे सर्वांना ही कल्पना सोडून द्यावी लागली. काही मंडळींनी मराठवाड्यासह 'महाविदर्भाचा' घाट घालून पाहिला, पण स्वामीजींनी तो ही हाणून पाडला. कोणतीच मागणी न करता किंवा अट न घालता जुन्या हैद्राबाद संस्थानचा मराठी भाषिक 'मराठवाडा' महाराष्ट्र राज्यात विलीन झाला. मराठवाडा महाराष्ट्रात विलीन करण्याचे संपूर्ण श्रेय संन्याशी व विरक्त वृत्तीच्या स्वामी रामानंद तीर्थांकडेच जाते.

स्वामीजींनी सक्रीय राजकारणातून अलिप्त राहण्यास सुरुवात करुन निवृत्ती घेतली. स्वत:ला विधायक कार्यासाठी वाहून घेतले. 'मराठवाडा विद्यापीठ' आणि 'मेडीकल कॉलेज' च्या निर्मितीतही स्वामीजींचा सिंहाचा

वाटा आहे.

विनोबा भावे तेलंगणात आले. स्वामीजी त्यांना जाऊन भेटले. त्यांच्यासोबत स्वामीजींनी भूदान चळवळीत भाग घेतला आणि तीही यशस्वी केली. स्वदेशीसाठी स्वामीजींचा फारच आग्रह असे. त्यातूनच ते खादी ग्रामोद्योग कामाकडे वळले. हैद्राबाद खादी ग्रामोद्योग समितीचे अध्यक्षपद त्यांच्याकडे आले. गांधीजींच्या विचारसरणीचा त्यांच्या मनावर आणि कृतीवर जबरदस्त पगडा होता. त्यांच्या प्रेरणेने नांदेड व औसा येथे ‘खादी ग्रामोद्योग केंद्र’ सुरु करण्यात आले.

# कृतार्थ जीवनाची सांगता

सगळी कामे करत असतानाच मनातली विरक्ती वाढतच होती. १९६५ मध्ये स्वामीजी पित्तापुरमला गेले. तेथेच स्वामी रामतीर्थांचा आश्रम होता. गुरुबंधू ओंकारस्वामींची भेट झाली. दोघांनी आपसात चर्चा केली.

अध्यात्म आणि विज्ञान याची सांगड घालणारा अभ्यासक्रम शिकविणारी एखादी संस्था सुरु करावी. सार्वजनिक काम करणाऱ्या कार्यकर्त्यांनी असे शिक्षण घेणे आजच्या काळात उपयुक्त होईल, सार्वजनिक जीवन अधकि शुद्ध होण्यास त्याची मदत होईल, असे दोघांचेही मत ठरले. यातूनच ‘स्वामी रामतीर्थ इन्स्टिट्युट ऑफ पीस’ ही संकल्पना साकारली.

निरनिराळे शिक्षणतज्ज्ञ आणि योगी पुरुषांच्या सल्ल्याने अभ्यासक्रम ठरविण्यात आला. आश्रमातर्फे ‘पीस’ हे मासिक स्वामीजी व तेथील सहकारी काढू लागले.

आयुष्यात शांतता अशी लाभलीच नाही. जीवन पूर्ण धकाधकीत व धावपळीतच गेले. मायेची आसक्ती तर कधीचीच झुगारुन दिली होती. जनसेवा व लोककल्याण यातच परमेश्वरी साक्षात्काराचा ते आनंद घेत होते. चंदनाप्रमाणे स्वामीजी सदैव झिजत राहिले. त्यांनी नेहमी दुसऱ्याचाच विचार केला.

१९६८ मध्ये ओंकार स्वामींनी हिमालयात जाण्याचा बेत आखला होता. स्वामीजींनीही तिकडे जाण्याचे ठरविले. त्यांचे आता तसे वय झाले होते. शरीर तर अपंग होतेच. पण त्यांचा उत्साह २५ वर्षाच्या धडधाकट तरुणालाही लाजवेल असा होता. तिकडे कडाक्याची थंडी पडली होती.याचाच परिणाम म्हणून १९७१ साली स्वामी आजारी पडले. हैद्राबाद सरकारने सर्वतोपरी उपचाराची व्यवस्था केली. उपचाराचा फारसा उपयोग झाला नाही. कसलीच आसक्ती राहिली नव्हती. जीवनाचा मोह तर कधीच धरला नव्हता. कोरड्या

परंतु समशीतोष्ण हवामानात थोडे बरे वाटेल, म्हणून स्वामीजींना अंबाजोगाईत आणण्यात आले. योगेश्वरी कॉलेजच्या नागापूरकर सभागृहाशेजारी जोडून असलेल्या छोट्याशा खोलीत त्यांची व्यवस्था करण्यात आली. त्यांचे मन तेथे रमेना म्हणून महिन्याभरातच ते पुन्हा हैद्राबादला निघाले जाताना त्यांनी सहकाऱ्यांना सांगितले, ''आता पुन्हा अंबाजोगाईला येणे नाही.'' हैद्राबादला आल्यावर कामाचा थोडा ताण त्यांच्यावर पडू लागला. त्यांची प्रकृती आणखीनच बिघडली. त्यांना दवाखान्यात ठेवण्यात आले. तेथे त्यांच्या खाटेजवळ भगवद्‌गीतेची प्रत, स्वामी रामतीर्थांचे ""In Woods of God Realization" असायचे, वाचण्याचे श्रम होत नव्हते. प्रकृती सुधारण्याऐवजी नवनवीन तक्रारी वाढतच होत्या. तब्येत खालावतच चालली होती.

२२ जानेवारी १९७२ ला दुपारी ३ वा. ३५ मिनिटांनी स्वामीजींचा आत्मा ब्रह्मानंदात विलीन झाला. स्वामीजींचा निवास बेगम पेठेत होता. शासकीय इतमामाने त्यांच्यावर अंत्यसंस्कार करण्यात आले. शोकाकुल मनाने संपूर्ण हैद्राबाद आणि सिकंदराबाद शहरातील जनसागर स्वामीजींच्या अंत्ययात्रेस लोटला होता. हैद्रबाबादचा मुक्तिदाता सर्वांना सोडून पंचतत्वात विलीन झाला होता.

फलाशा न धरता उघड्या डोळ्यांनी कर्म करणारा एक कर्मयोगी संन्यासी समाधिस्थ झाला होता. जे उदयाला आले होते ते अस्ताला जाणारच होते. पण अस्ताला जाण्यापूर्वी त्यांनी हजारो माणसाच्या आयुष्यात स्वातंत्र्याची प्रभा जागृत केली होती. भारताच्या स्वातंत्र्यलढ्यातले शेवटचे युद्ध जिंकणारा नि:शस्त्र सेनापती काळाच्या पडद्याआड गेला होता.